







नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

चित्रकार दीनानाथ दलाल ह्यांनी सन १९४७ ते १९७१ दरम्यान प्रसिद्ध केलेल्या दीपावली ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीय स्वरूपात जतन करण्याबाबतचा प्रस्ताव चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे राज्य मराठी विकास संस्थेस प्राप्त झाला होता. सदर प्रस्तावानुसार दुर्मिळ मराठी ग्रंथांचे संगणकीकरण ह्या प्रकल्पांतर्गत दीपावली नियतकालिकांचे अंक संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात राज्य मराठी विकास संस्थेद्वारे सहमती दर्शविण्यात आली.

चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला ही सामग्री संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहे.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.



अनुक्रमणिका







# दीपावली



क्रिकेट
शौकिनांसाठीं
खास पुरवणी

डिसेंबर '६७
वर्ष २३ वें
मूल्य १। रु.

अनुक्रमणिका








क्रिकेट शौकिनांसाठी खास
वार्षिक क्रिकेट पुरवणी



डिसेंबर १९६७
वर्ष २३ वे
मूल्य १। रु.

# दीपावली

रसिक महाराष्ट्राचा साहित्य कला-विलास

## श्रे य ना मा व लि–


● **पद्मश्री कर्नल सी. के. नायडू**–क्रिकेटचे भीष्माचार्य–**दि. वि. आमोणकर** ● **विचारांचे हिमालय**–एक चिंतनिका–**प्रा. अनंत काणेकर** ● **सुवर्णतुला** (उत्तरार्ध)–दोन बायका नि एक दादला–**व. पु. काळे** ● **विनोदी क्रिकेट**–खरचंच विनोदी–**प्रा. सुरेश गजेंद्रगडकर** ● **'कीचक'** (नाट्य)–येथूनच रंग भरतो –**अनु. प्रा. श्री. र. भिडे** ● **'चंद्र चवथीचा'**–क्रिकेटमधील 'ही' भानगड?–**वसंत नाईक** ● **घुस्मट**–अतिनाजूक भावकथा–**सरिता पद्की** ● **शालेय क्रिकेट संघाचे यश**–कर्णधार अजित नाईक यांची मुलाखत–**प्रा. अविनाश केळकर** ● **ललित कलावर्श**–मराठी मन जिंकणारे तीन पिढ्यांचे भूषण –**प्रभाकर नारायण वेलणकर** ● **क्रिकेटची पंढरी–ऑस्ट्रेलिया**...ब्रॅडमन दिसला, बोलला...आम्ही धन्य झालो...**रंगा सोहोनी** ● खास क्रिकेटच्या गंमती–जंमती–**सदानंद चेंदवणकर** आणि **द. श्री. कराडकर**


—शिवाय—

**ऐसी अक्षरे, दीपमाला, सन्मानपुष्पे, इंद्रधनुष्य ही सदरे, विनोद नि व्यंगचित्रे**


**Gram: Dalalart**
टे. नं. ३५७७६५






★ संपादक–मुद्रक–प्रकाशक–मालक श्री. **दीनानाथ दलाल**, दलाल आर्ट स्टुडिओ, ४०–४२, केनेडी ब्रीज, मुंबई ४. यानी स्टेट्स पीपल प्रेस, जन्मभूमि भवन, घोगा स्ट्रीट येथे छापले. या प्रतीस किंमत १। रु. + रजि. पोस्ट ६० पै. वार्षिक वर्गणी, दिवाळी अंकासह रु. १२॥. अंकांत प्रसिद्ध झालेली मतें ही चालकांचीहि अधिकृत मते असतातच असे नाही. प्रकाशित चित्रें व लेख यावरील सर्व हक्क दलाल आर्ट स्टुडिओच्या स्वाधीन आहेत.

Registered with the Registrar of Newspapers for India under No. RN 1612/57
DIPAVALI: Dalal Art Studio, 40-42, Kennedy Bridge, Bombay-4.




**दलाल आर्ट स्टुडिओ**
४२, केनेडी ब्रीज, मुंबई, ४,
टेलिफोन : ३५७७६५ ★ तारेचा पत्ता DALALART

● **वर्गणीदारास सूचना :** दीपावली व सर्व खास अंकांसह दीपावलीची वार्षिक वर्गणी रु. १२–५० पसे. द्वैवार्षिक वर्गणी रु. २०; त्रवार्षिक वर्गणी रु.२५ व चार वर्षांची वर्गणी रु. ३२. **परदेशीं वार्षिक वर्गणी** १६–००

● **वर्गणी** मनिऑर्डरनें द्यावी. चेक पाठविल्यास तो दलाल आर्ट स्टुडिओच्या नांवें, मुंबई बँकेवरचा असावा. इतर ठिकाणच्या बँकेवरचा असल्यास ७५ पैसे वटणावळ जादा पाठवावी. कोणत्याहि महिन्यापासून वर्गणीदार होता येतें.

● **अंक न पोचल्याच** कळवावयाचें झाल्यास ५ तारखपर्यंत वाट पाहून मग कळवावें. अंक ऑफिसमध्यें शिल्लक असल्यास जरूर पाठविला जाईल.

● **जाहिरातींचा व्यवहार** हा परस्पर विश्वासाचा असतो. गिऱ्हाईकांच्या इच्छेनुसार जाहिरात छापण्याची कोशिस करण्यांत येते. तरीहि तांत्रिक अडचणीमुळें अगर अन्य कारणामुळें जाहिरातींत कमी–जास्त फरक झाला तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकावर नाहीं.

● **साहित्याच्या स्वीकृतीचा** निर्णय महिन्याभरांत सामान्यतः कळविला जातो. पोस्टेज असलेलें नापसंत साहित्य परत पाठविलें जातें. पुरेसे पोस्टेज नसल्यास तें निकालांत काढलें जाईल.

● **स्वीकृत अगर इतर साहित्य** गहाळ झालें तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकावर नाहीं.

संपादक, मालक, मुद्रक व प्रकाशक श्री. **दीनानाथ दलाल** यांनीं स्टेट्स पीपल प्रेस, जन्मभूमि भवन, घोगा स्ट्रीट, फोर्ट, मुंबई १ येथें छापून, दलाल आर्ट स्टुडिओ, ४२ केनेडी ब्रीज, मुंबई ४ येथें प्रसिद्ध केलें.


# वेडा खाई पेढा....

शहाणा खाई वहाणा, वेडा खाई पेढा अशी एक म्हण लहानपणी कानावरून गेली. आणि तिचा अर्थच नोव्हेंबर १९६७ पर्यंत उमगत नव्हता, याच एका कारणामुळे ती लक्षात राहिली होती. पण नोव्हेंबरमधे सीमावादाबाबत मेहेरचंद-निवाडा प्रसिद्ध झाला. त्याची आधारभूत तत्वे; महाजन यानी केलेले "पोस्ट-मॉर्टेम" व विषबाधेची सांगितलेली लक्षणे चष्मा (कोणत्याही कोनाचा) न लावता अभ्यासिली आणि काय आश्चर्य? त्या म्हणीचा अर्थ उमगला... अगदी–आजी (सॉरी-अजी) म्यां बरम पाहिले–पायजेल हाये. . .

तसं पाहिलं तर नोव्हेंबर यंदा खरचंच गाजला. इतक्या अनंत घडामोडी (म्हणजे 'लक्षात घेणे' असलेल्या) घडल्या की दीपावलीचे सर्व साधे नि विशेषांक भरून निघावेत... जनसंघासारख्या कडकडीत निष्ठेची ग्वाही देणाऱ्या पक्षाच्या लोकप्रतिनिधींचे पक्षांतर, सीमा वादाबाबत बाजपेयी–जगन्नाथराव या मुलुख–मैदानी तोफांच्या विरुद्ध दिशा, पुणे शहर कॉंग्रेसच्या तोतयांचे बंड व ते निपटणारा 'बार-सम्राट' शहर कॉंग्रेस अध्यक्ष; स. का. पाटील यांची जरठ-कुमारी विवाहाची (कॉंग्रेस अध्यक्ष) धडपड, महामुंबईच्या पहिल्या नाक्यावर-ठाणे-शिवसेना-पालिकेच्या खळबळजनक घोषणा, पतौडी आणि क्रिकेट बोर्डाचे गोंधळी यांचा रंगलेला 'गंगू बाजाराला जाते जाऊ द्या' अशा थाटाचा वग, एक ना दोन एवढा फराळ अपुराच होता म्हणूनच की काय दिवाळी अंकांची "गाजलेली" दिवाळी... पण एवढ्याने झालेले अजीर्ण साफ व्हावे याच हेतूने श्रावणबेळगोळा येथील नंदीची घोर तपश्चर्या पाहून दयावंत (मेहेर=दया; कृपा) महाजनानी त्याला मोठ्या प्रेमाने बहाल केलेली बेळगावी झूल व कारवारी तंबाकूचा खुराक. ....यंव रे यंव... 'मेरा जूता है जापानी....' या एकेकाळी गाजलेल्या सिनेगीताचा निर्माता द्रष्टा होता यात काय संशय ?

नाहीतरी इंदिराबाईंनी 'अग अग म्हशी' ...म्हणत केंद्रीय मंत्रिमंडळाचा पसारा वाढविणे सुरूच केले आहे. तेव्हा त्याना 'जंते'ची प्रार्थना आहे की त्यानी विजापूर, धारवाड, कारवार, बेळगाव व बिदर हे पाच जिल्हे तसेच गोमंतक, दीव-दमण व कासरगोड–मंगळूर अशी स्वतंत्र राज्ये निर्माण करून जनकल्याणाचे पुण्य पवरी बांधावे... जय राष्ट्रीय एकात्मता !

**–संपादक**

## रसिकांचे त्रिवार अभिनंदन!!!

दीपावलीचा दिवाळी विशेषांक उत्तरोत्तर अधिकच लोकप्रिय होत असल्याची प्रचिती रसिकांनी यंदाही आणून दिली. त्याबद्दल त्यांचे मनःपूर्वक अभिनंदन आणि त्याना आमचे धन्यवाद! कागदाच्या टंचाईमुळे ऐन वेळी आलेल्या मागण्या नाकारताना वाईट वाटले. परंतु जनतेच्या गुणग्राहकतेबद्दल अभिमानही वाटला. रसिक वाचक, वर्गणीदार व एजंट याना पुन्हा धन्यवाद !

**–व्यवस्थापक**

## आकंठ तृप्तीची पावती

स. न. वि. वि.

दीपावलीचा दिवाळी अंक हा माझ्या बाबतीत दिवाळीच्या सणाचाच एक भाग आहे. आकाशकंदील, रांगोळ्या, उटणी, अत्तरे याशिवाय जशी मी दिवाळी कल्पू शकत नाही, तशीच दीपावलीच्या दिवाळी अंकाशिवायही ती कल्पू शकत नाही. अनेक वर्षांची ही परंपराच झालेली आहे. परिस्थितीच्या काचात आज जावे तेथे अपुरेपणा आणि चालढकल याची जाणीव होत असली तरी भाग्याची गोष्ट अशी की ही चालढकल आनंददानाच्या बाबतीत दीपावलीने मुळीच केलेली नाही. ज्या भरघोसपणाची अपेक्षा होती तो भरघोसपणा अंकात ओतप्रोतला आहे. आनंदाचे मोजमाप पैसे आणि मोबदला या शब्दात करता येणार असेल तर तुम्ही अंकाच्या किमतीचा मोबदला पुरेपूर दिलेला आहे.

पहिलीच चित्रकन्या पाहिली, आणि काहीतरी वेगळेपणा जाणवला. 'शुभंकरोतीच्या' संस्कारातून 'चारचौघात सांगू कशी' अशा संस्कारात गेल्यासारखे वाटले. पण चित्रसौंदर्याची मोहिनी अशी की कलाना असली बंधने नसतात हे सिद्ध झाले आणि माझ्याच नकळत मी संस्कृतीच्या विचारातून आनंदाच्या विकारात प्रवेशलो. शेवंती पाहिली आणि मग तर माझा मी उरलोच नाही. सारे आसमंत शेवंतीने बहरलेले वाटू लागले. अंक इथेच मनात शिरला आणि त्याच क्षणी दिवाळी उजळली. नंतर किती घेऊ, किती घेऊ, असे आनंदसाम्राज्य फुटले.

दीपावलीतील साहित्याकडे वळावयाचे ते चित्रे पाहून आकंठ तृप्ती झाल्यावर. चोरघडे यांच्याच कथेपासून मी अंक वाचावयास सुरवात करतो हे तुम्हाला माहिती आहेच. कथा मोठी मनोवेधी आहे. ठणठणपाळ याचे शब्द आठवून लिहावयाचे म्हणजे अशी कथा चोरघडे यानीच लिहावी व आम्हीच वाचावी. श्री. पु. ल. देशपांडे यांच्या अभावामुळे गेल्या वर्षी जो सुनेपणा जाणवला होता त्याचीही भरपाई यावर्षी दामदुप्पटीने झाली आहे. प्राध्यापक धोंड यांचा मला वाटते दिवाळी अंकात (दीपावलीच्या) यंदाच प्रवेश होत आहे. यावर्षी मला आवडलेल्या साहित्यात त्यांचा लेख मुद्दाम उल्लेखावधास हवा. अर्थात असा उल्लेख करण्याचा प्रयत्न करणे हेही वदतोव्याघाताला बळी जाणेच आहे. कारण जिथे सारेच उत्तमोत्तम आहे तिथे निवड करावयाची कशी आणि उल्लेख करावयाचा तरी कुणाकुणाचा ? धन्यवाद ! धन्यवाद!

**सहार, मुंबई २९ —आनंद साधळे**

## अनपेक्षित पण गोड धक्का

स. न. वि. वि.

दीपावलीचा दिवाळी अंक म्हणजे चुरचुरीत आणि रसरशित कथा, मस्त चित्रे, अरसिकालाही रसिक बनविणारी व्यंगचित्रे व व्यंग-रेखाटने असा आजवरचा अनुभव.

यंदा तो प्रत्यय आलाच. पण त्याहीपेक्षा अंकाने दिलेले गोड धक्के अधिक लक्षात राहतील. एकतर फक्त एकच दीर्घकाव्यकथा, बाकीचा चिल्लर खुर्दा गायब; दुसरे रंगात विनटलेली पुष्पांजली आणि तिसरे म्हणजे चित्रकार गोडसे, का. दा. नायक आणि म. वा. धोंड यांचे ललित साहित्य. ललित असूनही चिंतनीय. चित्रकार गोडसे यानी तर काही अपेक्षाही निर्माण केल्या आहेत. कदाचित त्यानी 'दीपावली'चा आदर्श ठेवून साधना सुरू केली असावी.

चारशे पैसे पुरेपूर वसूल झाल्याने मनःपूर्वक धन्यवाद.

**चेंबूर, मुंबई रमाकांत ध. पारकर**

## इयर्स बेस्ट ?

स. न. वि. वि.

दीपावलीचा दिवाळी अंक घरी पोस्टाने आल्यानंतर तो अस्मादिकांकडे पोहोचेपर्यंत पंधरा वीस दिवस निघून गेले. कारण घरातील मंडळी आणि परिचितांपैकी नियमितपणे, सांगितल्या दिवशी दरमहा मासिक परत करणाऱ्या काही मित्रांनी तो हातोहात झेलला होता.




अंकाची सजावट—लाक्षणिक तसेच व्यवहारतःही—खरोखरच चांगली आहे. रंगी-बेरंगी व्यंगचित्रमाला या खास आकर्षणाने तर सर्वच मर्मांवर नेमके बोट ठेवले आहे.

शरद्चंद्र चिरमुले दीपावली दिवाळी अंकात प्रथमच आढळले. तसेच वा. रा. सोनार, का. दा. नायक, प्रा. धोंड, गोडसेही मंडळी ही प्रथमच दिवाळी दरबारात दिसली. पण ती सर्व लक्षात मात्र नक्कीच राहिली. भोबे व ताटके यांच्या कथात डावे-उजवे कोणास म्हणावे ?

पण पु. ल. नी मात्र 'इयर्स बेस्ट' म्हणून दिलेली कथा (मूळ जाहिरातीत वेगळेच होते !) वाचल्यानंतर मीही अक्षरशः टाळयाच वाजविल्या. कारण ? पु. लं. चा नानू-ब्रँड आणि 'पु. लं.' साठी दीपावलीने वेडेपिसे होणे . . . हे इयर्स बेस्ट की वर्स्ट ?

आपला

**नागपूर —चंद्रकांत धुमाळ**












# भारतीय क्रिकेटचे भीष्माचार्य

## पद्मश्री

# कर्नल सी. के. नायडू

पद्मश्री कर्नल सी. के. नायडू यांच्या निधनाने (१३-११-६७) भारतीय क्रिकेट महाभारतातील "भीष्मपर्व" संपले आहे. त्यांच्या क्रिकेट खेळातील नैपुण्याचा परिचय घडविण्याचा या लेखात प्रयत्न केला आहे. त्यांचे मुंबईतील प्रेक्षकांना जे दर्शन घडले त्यावर भर देण्यात आला आहे.

—दि. वि. आमोणकर

**उंच** सडसडीत शरीरयष्टी, ताठ चाल पण त्यातहि धिमो लयबद्धता, तीक्ष्ण नजर, रुबाबदार चेहरा, पाहिल्यावर छाप बसेल असे व्यक्तिमत्व या गुणवैशिष्ट्याने क्रीडांगणावर प्रवेश करणारे श्री. नायडू हे जणू काय क्रिकेटसारखा बादशाही खेळ खेळण्यासाठी व त्यातहि नेतृत्व करण्यासाठीच जन्माला आले असावेत असे त्यांना ज्यानी पाहिले असेल त्यांस वाटल्यावांचून राहणार नाही.

१९१२ सालापासून मुंबईत चौरंगी सामने खेळण्यास सुरवात झाली. युरोपियन, पारशी, हिंदू व मुसलमान या चार जातीय संघात हे सामने खेळले जात. त्यापूर्वी पहिल्या तीन जातीय संघात खेळले जात असत; कारण हा खेळ मुंबईत विशेषेकरून या जमातीत लोकप्रिय झाला होता. १९१२ सालपासून मुसलमान संघाला त्यात प्रवेश मिळाला व अशा रीतीने "तिरंगी"चे "चौरंगी झाले. १९३७ साली "रेस्ट" संघ—यावरील चाराशिवाय उरलेल्या जातींचा—संघ त्यात समाविष्ट करण्यात आला व "चौरंगी"चे स्वरुप "पंचरंगी" झाले. त्यानंतर हे सामने काही वर्षे चालले व हे जातीय सामने १९४७-पासून रद्द करण्यात आले व हे "जातीयते"वर आधारलेले हे कारण देण्यात आले. पण या जातीय सामन्यानी त्यांच्या अखिल भारतीय स्वरुपामुळे व ज्या भावनेने ते खेळले जात त्यामुळे क्रिकेटचा खेळ लोकप्रिय करण्याची व खेळाची प्रगती करण्याची मोठी कामगिरी उत्कृष्टपणे बजावली आहे यात शंका नाही.

श्री. नायडू यांनी क्रिकेटच्या पहिल्या दर्जाच्या सामन्यात—या चौरंगी सामन्यात १९१६ साली पदार्पण केले व जवळ जवळ तीन तपे या सामन्यात व क्रिकेटच्या खेळात फार महत्वाची कामगिरी केली; ती इतकी की नायडू म्हणजे या खेळातील एक मोठे आकर्षण झाले. हे चौरंगी सामने खेळण्यात येत त्यापूर्वी काही निवडक सामने संघ निवडीसाठी निरनिराळ्या जिमखान्यावर शनिवार-रविवारी होत असत. श्री. नायडू हे बाहेरगांवाहून मुंबईस खेळण्यात येत. ते आले असे कळले की या असल्या सामन्यात देखील त्यांचा खेळ पाहण्यास प्रेक्षकांची जत्रा भरत असे इतकी "नायडू" या नांवाची मोहिनी क्रिकेट रसिकांवर पडली होती.

श्री. नायडू हे प्रथम मध्यमगतीचे गोलंदाज म्हणून हिंदूसंघात आले; पण एक दोन वर्षात दणदणीत खेळणारे फलंदाज म्हणून प्रसिद्धीस आले. या चौरंगी सामन्याशिवाय इतर सामनेहि मुंबईत खेळण्यात येत व तेहि सध्याच्या "बॉम्बे" जिमखान्यावर. १९१८ साली "इंग्लंड विरुद्ध हिंदुस्तान" हा सामना खेळण्यात आला. "इंग्लंड" संघाचे नेतृत्व त्यावेळचे मुंबईचे गव्हर्नर लॉर्ड विलिंग्डन व "हिंदुस्थान" संघाचे महाराज पतियाळाचे भूपेंद्रसिंग यांजकडे होते. या सामन्यात स्वतः पतियाळाचे महाराजांनी दणकेबाज खेळ केला व षट्कार चौकारांचा पाऊस पाडला. श्री. पी. विठ्ठल व श्री. नायडू यांनीहि फलंदाजीत पराक्रम केला होता. श्री. नायडू यांनी सहा षट्कार व तेरा चौकार मारून व्यक्तिशः १२२ धावा केल्या व अवघ्या दोन वर्षात दणदणीत फलंदाज म्हणून नांवलौकिक कमावला. चौरंगी सामन्यात त्यांनी फलंदाज म्हणून बरेच विक्रम केले. शिवाय इतर सामन्यातहि फलंदाजीत बराच पराक्रम दाखविला. गोलंदाजीत पहिला जरी नसला








**वैभवशाली खेळाने अढळपद मिळविणारे क्रिकेट सप्तर्षि**

**सी. के. नायडू, जहांगिरखान, पी. विठ्ठल, श्री. देवधर, एल. पी. जय, होमी वजीफदार आणि एस. आर. गोडांबे.**

तरी दुसरा दर्जा त्यांनी सांभाळला होता. क्षेत्ररक्षणात तर हातखंडा होता. १९५७ पर्यंत क्रिकेटच्या जगात फलंदाज, कर्णधार व निर्माता—क्रिकेटपटू निर्माण करणारा शिक्षक—या तीनहि क्षेत्रात त्यांनी फारच मोठी कामगिरी केली.

श्री. नायडूंचा फलंदाज या नात्याने संस्मरणीय खेळ पुष्कळ सामन्यात झाला आहे. आणि तो सर्व चौरंगी सामन्याच्या त्या कालात —१९१६ ते १९३८ प्रामुख्याने. १९२३ साली युरोपिअन्स विरुद्ध हिंदूसंघाने मोठ्या जिद्दीने विजय मिळविला. त्यावर्षी युरोपिअन्स हा संघ प्रबल संघ होता. त्यावेळी राजेरजवाडे आपापल्या संघातील खेळाडूंना शिक्षण देण्यासाठी इंग्लंडमधील उत्तमोत्तम नामांकित खेळाडूंना आपापल्या राज्यात बोलावून घेत व त्यांस त्या कामासाठी पैसे देऊन नेमीत असत. शिवाय मुंबई व कलकत्ता येथे नोकरीसाठी आलेल्या युरोपिअन्समध्ये उत्तम क्रिकेट खेळाडू असत. यामुळे हा संघ प्रबल होत असे. यावर्षी हिंदू संघाचे नेतृत्व श्री. विठ्ठल यांजकडे पहिल्यान्दाच देण्यात आले होते. युरोपिअन्स संघाने पहिल्या डावात ४८१ धांवा केल्या तर हिंदू संघाने जिद्दीने खेळून तो डावात सहा धांवानी कमी पडला. दुसऱ्या डावात एवढा प्रबल संघ थोडक्या धांवात बाद करणे शक्य नव्हते. पण हिंदू संघाच्या श्री. एस्. एम. जोशी या गोलंदाजाने पराक्रम करून ३९ धावात सात गडी बाद केले व सर्व युरोपिअन्स संघ १५३ धांवात बाद केला. अवघ्या अडीच तासाचा अवधि; सामना जिकण्यासाठी १६१ धांवाची जरुरी; त्यात खेळपट्टी तीन दिवसांच्या खेळामुळे खराब झालेली व गोलंदाजाना उपकारक; दर मिनिटाला एक अशी धांव काढली तरी वेळ अपुरा. त्यामुळे सामना अनिर्णित राहणार अशीच सर्वांची कल्पना. या प्रसंगाचे वर्णन करताना त्यावेळचे हिंदूचे कर्णधार श्री. विठ्ठल लिहितात:—

"हा उद्देश साधायचा तर अर्थातच जलद धावा करणे अवश्य होते आणि यामुळेच परदेशी यांच्या जोडीला नवल्यांऐवजी नायडू यांनाच पहिल्या जोडीत खेळण्याची मी विनंती केली (नायडू हे बहुत करून पांचव्या अगर सहाव्या क्रमांकावर फलंदाजी करीत) त्यानीहि ही जबाबदारी मोठ्या आनंदाने पत्करली आणि इतक्या यशस्वीपणे आणि तडफदार रीतीने पार पाडली की जमलेला सारा प्रचंड प्रेक्षक समुदाय त्या क्रीडानंदाने बेहोषच होऊन गेला. पन्नास धांवात पहिली विकेट पडेल अशी ट्रेव्हर्स (युरोपिअन संघाचा कर्णधार) यांची अपेक्षा होती; पण पन्नासनंतर शंभराचा आकडा फलकावर झळकला तरी विकेट पडण्याचे चिन्ह दिसेना आणि दोघेहि बॅट्समन धिटाईने बोलिंग सारखी चोपून काढीत होते. नायडूंच्या टोलेबाजीने तर त्या दिवशी परिसीमाच गांठली ! वॉडबी (बॉम्बे जिमखान्याच्या उजव्या हातावरचा रस्ता) रोडवर त्यानी मारलेली सिक्सर जबरदस्त होती. नायडू ७६ धांवा करून बाद झाले त्यावेळी आमच्या १३६ धांवा झाल्या होत्या. सामना जिंकण्यास आणखी २५ धांवांची जरुरी होती व अर्धापाऊण तासाचा अवधि अजूनहि उरला होता. नायडूंची जागा मी घेतली आणि त्यानंतर पंधरा वीस मिनिटातच १६० धांवांची मर्यादा आम्ही गाठली. परदेशी यांच्या व्यक्तिशः ७१ धांवा झाल्या होत्या. चौकाराचा एक फटकारा मारून आकडा पुरा केला आणि आम्ही विजयी झालो." (माझे क्रिडाजीवन).

त्यानंतर त्यांचा उल्लेखनीय विक्रम एम्. सी. सी. (गिलीगन) संघ विरुद्ध हिंदुसंघ या सामन्यात १९२८ साली. एम्. सी. सी. संघातील मि. अर्ल याने टोलवाटोलवी करून व्यक्तिशः १३० धांवा काढल्या. त्यात नऊ षट्कार होते. मि. अर्ल यांची देहयष्टी जाडजूड व उंचीपुरी होती की नऊ षट्कार तिला झेपण्यासारखे होते. प्रेक्षकाना आपण आज एक प्रेक्षणीय खेळ पाहिला असे समाधान वाटत होते. त्याचवेळी आपल्या संघाच्या बाजूने हा विक्रम किंवा अशा प्रकारचा पराक्रम कोण करील कीं काय याबद्दल शंका वाटत होती. शंका वाटण्याचे कारण म्हणजे एम्. सी. सी. संघाची प्रबल गोलंदाजी. ऑस्ट्रेलियाच्या विरुद्ध खेळून गोलंदाजीत नांव कमावून व त्यावेळच्या प्रमुख गोलंदाजांपैकी एक अशी मान्यता पावलेले मि. मॉरिस टेट हे एक गोलंदाज होते. त्याशिवाय ॲस्टिल, गिअरी, मर्सर हेहि नामांकित गोलंदाज मदतीला होते. पण दुसऱ्या दिवशी श्री. नायडूंची फलंदाजी पहाण्याचे भाग्य लाभले त्या प्रेक्षकांना आदल्या दिवशीच्या समाधानापेक्षा कितीतरी पटीचे जास्त समाधान लाभले आणि ते देखील अभिमानाचे. त्यादिवशी श्री. नायडूंची फलंदाजी उत्स्फूर्त स्वरुपाची














# पाणावल्या डोळ्यात

पाणावलेल्या डोळ्यात आज एक गहिऱ्या डोळ्यांची, बुलंद शरीराची हसरी मूर्ति तरळते आहे. ते प्रौढ मोजके दाणेदार शब्द ऐकण्यासाठी आज श्रवणे लोभावली आहेत. तो खलनायकाच्या सोंगात नेहमी दिसणारा पण हृदयात 'लाख माणूस' असलेला माणूस जवळ असावा. त्यानं मोजकं बोलावं. इवल्या शब्दात डोंगराएवढा अर्थ आढळावा असं सारखं वाटत आहे.

ते किरमिजी, कमालीची जरब बसवणारे डोळे लहानग्यांच्या कौतुकानं पाणयळावेत, त्या पाण्याबरोबर, त्या शुद्ध सात्विक साऱ्या गंगाजलाबरोबर, शंकाकुशंका वाहून जाण्यात असा ध्यास मनाला मनस्वी हैराण करतो आहे. तो 'गंगानाथ,' त्याचा छचोरपणा, पाटलाच्या पोरांचा, भलामर्द वाघासारखा, वस्ताद, कृष्णाचांभार, सारे आज स्मृतींच्या दांडयावर बसून आम्हाला हसताहेत. सांगताहेत— "आम्हाला फार फार मोठी रंगभूमि मिळालीय् रे इथं स्वर्गात." आम्ही कुणाकडं पहायचं हो ! कुठं पहायचं !

झुंझाररावासाठी कमळजा रडते आहे. झुंजार नटासाठी रंगभूमि धाय मोकलते आहे. कुणी पुसायचे ते नेत्र ? आसवांचा जिवंत झरा थांबेल का कधी ?

किती आठवणी घेऊन हा वाहतो आहे हा झरा. लेखण्यांचे मालक, रंगाचे अधिकारी सारे सारे इथं पहाताहेत आपलीच रडवेली प्रतिबिंबे ! त्यात तो कुठं दिसत नाही नटश्रेष्ठ ! अनेकाना दिलासा देणारा !! अनेकांच्या पाठीवर अधिकारानं फिरणारा सहानुभूतीचा प्रेमळ हात आज कायमचा दिसेनासा झाला. तो दूर गेला आहे. बेंबीच्या देठापासून हाक मारली तरी बाबुराव तुम्हाला ऐकू जायची नाही. तुम्ही फार पुढे गेलात ! फार पुढे.

आमच्या पायात घोटाळताहेत पांगळ्या आठवणी—तुम्ही त्या रंगभूमीवर आपला प्रकाश पाडाल. पण पाडा, कळू द्या स्वर्गस्थांना मर्त्यांची किमया, ते मेले तरी म्हणावं नाटय मरत नाही.

—बिंधुमाधव

झाली. षट्कार व चौकारांचा जणू काय कैफ चढलेला होता. एकाहून दुसरा नयनमनोहर व लांब पल्ला गांठणारा षट्कार ! पांचवा की सहावा षट्कार त्यांनी मि. मॉरिस टेटच्या गोलंदाजीला मारला तो इतका जोराचा होता कीं सीमारेषेच्या बाहेर तो पंधरा वीस यार्ड अंतरावर पडला. या षट्काराचे स्वागत प्रेक्षकांकडून अतिशय उत्साहाने होणे साहजिक होते. एक तर मि. मॉरिस टेटसारखा जगद्विख्यात गोलंदाज आणि त्याच्या गोलंदाजीवर इतका समर्थ पल्लेदार षट्कार. प्रेक्षकांचे डोळ्याचे पारणे फिटले. त्यादिवशी श्री. नायडू यानी एकाहि गोलंदाजाची गय केली नाही. अकरा षट्कार व तेरा चौकार मारून व्यक्तिगत १५३ धांवा काढून बाद झाले व हिंदी फलंदाजीला पहिल्या वर्गाचे स्थान त्यांनी प्राप्त करून दिले.

तेच श्री. नायडू किती धिमा खेळ खेळू शकतात त्याचे प्रात्यक्षिक त्यानी १९३२ साली एम्. सी. सी. (जार्डिन कर्णधार) च्या विरुद्ध झालेल्या पहिल्या कसोटी सामन्यात दाखविले. ते हिंदी संघाचे कर्णधार होते. त्या सामन्यात दुसऱ्या डावात लाला अमरनाथने उत्कृष्ट फलंदाजी करून ११८ धांवा काढल्या. त्या दिवशीचा अमरनाथचा खेळ अविस्मरणीय झाला. जणू काय कव्हर ड्राइव्ह करण्याची त्यांना त्या दिवशी स्फूर्ति आली होती. इतके दणकेबाज व जोरदार. त्यांना साथ देण्यासाठी श्री. नायडू हे जबाबदार कर्णधाराप्रमाणे खेळले. त्यांनी ६७ धांवा काढल्या पण ज्या वेळात त्यांनी त्या काढल्या त्याकडे लक्ष दिल्यास ते फारच धिम्या रीतीने खेळले असेच म्हणावे लागते. उत्स्फूर्त फलंदाजी करीत असलेल्या आपल्या साथीदारास त्याच्या कलाने कसे घ्यावयाचे व आपल्या खेळाला कसा लगाम घालावा याचे जणू काय प्रात्यक्षिक त्यानी त्या दिवशी दाखविले.

श्री. नायडू त्यांच्या आक्रमक व दणकेबाज फलंदाजीमुळे भारतातच नव्हे इंग्लंडमध्ये देखील लोकप्रिय झाले. या बाबतीत त्यांचा क्रमांक अद्याप पहिलाच लागतो. त्यांच्या इतकी लोकप्रियता व आकर्षण दुसऱ्या कोणत्याहि फलंदाजाच्या वाट्यास आलेले नाही. लाला अमरनाथ याच्याबद्दल सुरवातीला आशा वाटू लागली होती पण पुढे इतकी टिकली नाही. व दीर्घ कालमर्यादेच्या बाबतीत तर नाहीच नाही.

श्री. नायडूंच्या फलंदाजीत आत्मविश्वास व जिद्द यांचा समन्वय दिसून येतो. खेळपट्टीवर आल्यावर पहिली दोन तीन षट्के त्याना मूळ धरण्यास लागत व एकदा प्रकाशाला नजर सरावली की ते आक्रमक धोरण सुरू करीत—गोलंदाजाला आपल्यावर वर्चस्व करावयास देत नसत. त्यापुरते साहस करण्यात येई मग त्यांच्या जवळील शस्त्रसाठ्यात असलेल्या पुल, कट व ड्राईव्ह या फटक्यांच्या जोरावर धांवा घेत. धांवाची संख्या वाढू लागली की त्यामुळे गोलंदाजाचा आत्मविश्वास कमी होई व त्यांचा स्वतःचा वाढत असे. बॉम्बे जिमखान्यावर होणाऱ्या चौरंगी सामन्यातील शेवटच्या वर्षी सयिद अहमद व महमद निसार यांची जलदगती गोलंदाजी कशी खेळावी याचे जणू काय प्रात्यक्षिकच त्यांनी त्यावर्षी श्री. नवमल भागीदार असताना

दाखवून दिले. जलद गोलंदाजी खेळणे हिंदूच्या काही चांगल्या फलंदाजांना जमत नसे. पण याचा बाऊ श्री. नायडू यांना कधीच वाटला नाही. ज्या अर्थी आपल्याजवळ बॅट आहे त्याच्या जोरावर फलंदाजाने आक्रमक धोरणान तोंड दिले पाहिजे असेच त्यांचे मत होते.

श्री. नायडू व षट्कार हे समीकरण झाले होते. त्यांच्या काळात षट्कार मारणारे प्रसिद्ध फलंदाज म्हणजे पतियाळाचे महाराज श्री. भूपेंद्रसिंग व पारशी फलंदाज श्री. डॉली कापाडिया हे होते. पतियाळाच्या महाराजांचे षट्कार म्हणजे शक्तीची करामत. त्यांचे मनगट भरदार व विस्तृत होते. अंगकाठी भरलेली व मनगटाच्या शक्तीच्या जोरावर ते फटके मारीत. त्यांनी मारलेला चेंडू उंच पल्ला गाठत नसे. पल्ल्यात सांपडला की चेंडू हाणणे हेच मुख्य. याचे प्रात्यक्षिक १९१८ मध्ये इंग्लंड विरुद्ध हिंदुस्थान या सामन्यात पाहण्यास मिळाले. त्यांचे षट्कार उंच नसत. मात्र अधांतरीचे फारच मोठे अंतर कापून सीमामर्यादेच्या पलीकडे फार अंतरावर पहिला टप्पा पडत असे. जवळ जवळ तीच तऱ्हा श्री. डॉली कापाडियाची. मात्र त्यानी टोलावलेला चेंडू सीमामर्यादेच्या बाहेर थोडयाच अंतरावर पडे. श्री. नायडू यांचे षट्कार लवचिक मनगटाच्या जोरावर व अचूक वेळसंधान साधण्यावर होते. फटकावण्याच्या आवाक्यात गोलंदाजाचा चेंडू आला की टप्प्याचे वेळसंधान साधून बॅटची हालचाल व पदलालित्याच्या मदतीने शरीराचा तोल यांचा समन्वय करून ते चेंडू उचलीत. तो उंचीमुळे लांब पल्ला गाठीत असे. शक्तीपेक्षा कौशल्याचा भाग त्यात अधिक असे म्हणून ते षट्कार प्रेक्षणीय वाटत. तसे षट्कार अलीकडे क्वचितच् दिसतात.

क्रिकेटच्या खेळातील क्षेत्ररक्षणाच्या विभागात त्यानी मिळविलेले प्राविण्य असामान्य होय. क्षेत्ररक्षणाकडे त्यांचे फार लक्ष होते. इंदूर येथील मध्यभारत संघाची यशस्वी निर्मिती त्यांनी या गोष्टीवर लक्ष देऊनच केली होती. त्यांच्या कारकीर्दीत दोन प्रसंगांची आठवण झाल्याशिवाय राहात नाही.

चौरंगी सामन्यात (हिंदू विरुद्ध मुसलमान) एका वर्षी मुसलमान संघातर्फे श्री. हसनशहा हे फलंदाज खेळत होते. श्री. हसनशहा यांच्या फलंदाजीचा सर्व भर ऑफ ड्राइव्हवर विशेष होता. असे जोरदार व झणझणीत फटके ते मारीत की ते अडविण्यासाठी मध्ये हात घालणे क्षेत्ररक्षकाला भीतीचे वाटे. या जोरावर त्यांनी आपले शतक पुरे करीत आणले होते. गोलंदाजीत बदल करण्यात आला व श्री. चंदाराणाकडे गोलंदाजी देण्यात आली. पॉइन्टच्या जागेवर श्री. नायडू यांना उभे करण्यात आले. शतक पुरे करू न देण्यासाठी ही योजना करण्यात येते आहे हे प्रेक्षकांस कळून आले–श्री. चंदाराणा यानी चेंडू फेकला व श्री. हसनशहाने तितक्याच जोराने तो हाणला. बॅटीचा मोठा आवाज झाला. श्री. हसनशहाच्या फटक्याला प्रेक्षकांनी टाळ्याच्या कडकडाटाने जोरदार साथ दिली पण पाहतात तो श्री. हसनशहा जिमखान्याकडे परत जात आहेत व श्री. नायडू झेललेला चेंडू हातातल्या हातात खेळवीत आहेत.

## वडवानल शमला डॉ. लोहिया



एक क्षुल्लक वाटणारी ठिणगी. गवताचे एक पाते पकडते त्याला पेटविते. त्यातून अनेक ठिणग्या उडतात. पहाता पहाता सारे रान पेटून निघते. तो वणवा शमविण्याचे सारे प्रयत्न व्यर्थ होतात. आपलीही आहुति त्यात पडणार नाही ना या आशंकने व्याकूळ होतात. सहस्रावधी लळाळत्या जिभांनी वणवा जवळ जवळ सरकतो. धग आणि चटके बसू लागतात. आटोपले सारे म्हणून शेवटची आळवणी – देवाची – सुरू होते. परंतु मरणही इतके सहज लाभत नाही. एकाएकी वायूच मंदावतो नि काही क्षणात वणवा क्षीण होऊ लागतो. अखेर तो आटोक्यात येतो नि शांतही होतो.

डॉ. राम मनोहर लोहिया यांचे जीवन आठविताना असा भीषण वणवाच नजरेसमोर तरळतो. फरक इतकाच की जंगलातला वणवा आटोक्यात येतो. तर डॉक्टरांचा संताप, अगतिकतेविषयीची चीड, ऐतखाऊंचे बाबतीतील कटुता हे आवरण्यासाठी अखेर मृत्यूलाच आपले पाश फेकावे लागले आणि यमदुतांशीही दोन हात करूनच तो वणवा शांत झाला.

'जवाहरलालनी वेचलेल्या माणिकमोत्यांपैकी हे एक. त्याचा कंठा करून काँग्रेसने मिरविला. परंतु ह्या माणिकाचा झगमगाट इतका प्रखर की खुद्द जवाहिऱ्याचेच डोळे दिपले नि पहाता पहाता पक्षशिस्तीची सर ओघळली. माणिकानेच मगरीला गिळण्याचा प्रकार घडला.

गेल्या दहा पंधरा वर्षांत डॉ. लोहिया यानी सत्ताधाऱ्यांना तसेच इतर राजकारणधुरंधरांना इतके जबरदस्त चटके दिले (आणि तेही एका पाठोपाठ एक असे) की काँग्रेसची सफेद झूल पांघरणाऱ्या अनेक मातब्बरांची चामडी जळून खाक झाली. लोहिया जनतेला त्यामुळेच अधिकाधिक प्रिय बनले. 'बाप दाखव नाहीतर श्राद्ध कर' ही रोखठोक प्रवृत्ती लोकसंग्रह करती झाली. तसेच त्याचे प्रवृत्तीने त्याना अनेक शत्रुही निर्माण झाले. परंतु अजातशत्रुत्व अंगी असल्यानेच ते सर्वानाच आवडले. सर्वांचेच प्यारे ठरले.

अन्यायाविरुद्ध संघटितपणे झगडण्याची जिद्द व प्रेरणा यांची ठिणगी ठेऊनच डॉ. लोहियानी आपला निरोप घेतला. त्यातही घाईच केली. पण आले देवाजीच्या मना तेथे काही चालेना हेच खरे.

त्या दिव्य आणि दाहक नेतृत्वाचा वारसा पुढे चालविणे हीच खरी श्रद्धांजली... डॉ. लोहियांचे पुण्यस्मृतीला शतशः अभिवादन !

–आदित्य








# तिळगूळ घ्या, गोड बोला!



## हद्दपार पारशी खेळाडू



क्रिकेटचे भारतात आगमन झाले तेव्हा जुन्या मुंबईत पारशांना क्रिकेटचे भारी वेड होते. पारशांचे बरेचसे क्रिकेट क्लब्स् तेव्हा येथल्या ओव्हल क्रीडांगणावर खेळत असत. एकदा असाच एक खेळ सुरू असताना मैदानावरून एका युरोपियन पोलिस ऑफिसरची बायको जात होती तिला चेंडू लागला. तिला कुठल्याही प्रकारची इजा झाली नव्हती. तरीहि गोऱ्या मडमेला चेंडू लागला म्हणून ते प्रकरण बरेच गाजले, व पोलिसांनी पारशी क्रिकेटपटूना त्या मैदानावरून हुसकून लावले.

तेव्हा त्या खेळाडूंनी तत्कालीन दयाळू न्यायाधीश सर जोसेफ अरुंडेल याना गाठून आपली कहाणी सांगितली. मग सर साहेबांनी 'बॉम्बे गॅझेट' या पत्रात स्वतःच्या सहीने पत्र लिहून हा प्रकार वेशीवर टांगला व खेळाडूंना ओव्हलवर पूर्ववत् क्रिकेट खेळण्यास परवानगी द्यावी अशी मागणीहि केली. पण तिचा व्यवहारात काही उपयोग झाला नाही. फक्त या पत्रामुळे बॉम्बे गॅझेटने एक अग्रलेख लिहून या प्रकाराबद्दल पोलीस कमिशनरवर खरमरीत टीका केली. कमिशनरने या टीकेला उत्तर दिले. मात्र पारशी पोरे क्रिकेट खेळताना दंगामस्ती फार करतात व त्यामुळे इतरांना त्रास होतो, या सबबीवर त्याना ओव्हलवर खेळण्यास बंदी झाली ती अगदी कायमचीच! पारशांना मग एस्प्लेनेड मैदान गाठावे लागले.

त्याबरोबर प्रेक्षकातून पुन्हा टाळ्यांचा कडकडाट झाला. योजलेला शह यशस्वी झाला. त्यास कारण श्री. नायडूंचे क्षेत्ररक्षण. दुसऱ्या कुणी हा झेल पकडला असता की नाही ही शंकाच होती.

दुसरे प्रात्यक्षिक पाहावयास मिळाले पंचरंगी सामन्यात. १९३८ साली ब्रेबॉर्न स्टेडियमवर हिंदू संघ पहिल्या डावात अहमद निसार व सयीद अहमद यांच्या गोलंदाजीमुळे व खेळपट्टीच्या ओलसरपणामुळे अवघ्या सत्तर धावात बाद झाला. मुसलमान संघाची फलंदाजी चांगली झाली होती. शेवटची जोडी खेळत होती. निसारने चेंड टोलावला तो उंच सीमारेषेकडे. श्री. नायडू तेथे क्षेत्ररक्षण करीत होते. त्यानी तो बरोबर हेरला. डोक्यावरील टोपी खाली फेकली. योग्य पद्धतीने स्वस्थ उभे राहिले व अलगद चेंडू झेलला. त्यामागील सर्व कृति आत्मविश्वासपूर्ण अशाच होत्या; जणू काय असे उंच उडालेले झेल कसे पकडावे याचे त्यानी इतर खेळाडूंना व रसिक प्रेक्षकांना एक सुंदर प्रात्यक्षिक दाखविले.

श्री. नायडूंच्या वेळी क्रिकेटच्या खेळाचा उज्ज्वल काळ होता. त्यांत अतिरथी महारथी सातत्याने व प्रकर्षाने भाग घेत होते. तो काळ या खेळातील राजे, महाराजे, अमीर, उमराव यांचा होता व त्यात श्री. नायडू एखाद्या सम्राटासारखे वावरत होते, असे त्यांचे व्यक्तीमत्व होते. त्यांच्या निधनाने आता या सर्व गोष्टी– ते षट्कार, ते चौकार, ते क्षेत्ररक्षण–स्मृतीच्या स्वरुपात विलीन होत आहेत. किती मनोहर व आनंददायी!

●●●



# विचारांचे हिमालय

--प्रा. अनंत काणेकर

**'जगण्यात** साहस हवं,'' असं कुणीतरी म्हणाला, तेव्हा चटकन् गमतीने मी म्हणालो, 'अहो, जगण्यात आणखी साहस कशाला हवं? जगणं हेच केवढ प्रचंड साहस आहे?'

**माणूस जगला म्हणजे ?**

मला असं म्हणायचं होतं की, 'जगणं' हा शब्द आपण मनुष्य-प्राण्याच्या संदर्भात वापरतो तेव्हा केवळ जन्माला आल्यानंतर मरेपर्यंत केवळ मिळेल ते–मिळेल तसं खाऊन भूक भागवणं, तहान शमवणं, नि आहारनिद्राभयमैथुनादि क्रिया करीत एक दिवस शेवटचा श्वास सोडणं अशा अर्थानं वापरीत नाही. मनुष्याच्या जगण्याचा इतकाच अर्थ असता तर तो झाडाच्या ढोलीत किंवा पर्वताच्या गुहेत राहून या फांदीवरून त्या फांदीवर उड्या मारीतच आजतागायत राहिला असता. पण तो तसा राहिलेला नाही. तो क्षणोक्षणी धोके पत्करीत, साहसं करीत गुहेत रहाण्याच्या अवस्थेतून गगनचुंबी महालांच्या एकशेविसाव्या मजल्यावर रहाण्याच्या अवस्थेत आला आहे. चंद्रावर वसाहती करण्याचा विचार करतो आहे. या फांदीवरून त्या फांदीवर उड्या मारता मारता कोणताहि पक्षी कधीहि गेला नव्हता इतक्या उंचीवरून जेट विमानाचा प्रवास ताशी दोन हजार मैलांच्या गतीनं करतो आहे. निसर्गात कधी न दिसणाऱ्या रंगाची चित्रं पाहून डोळे निववतो आहे.

> सर्व प्रकारचा त्रास सोसून एकदा त्या शिखरावर पोहोचल्यानंतर निसर्गाचं जे रुद्ररम्य अलौकिक दृश्य दिसतं त्यातच सारे कष्ट भरून पावतात . . .

एकाहून एक सुंदर सुरांच्या खुलावटीनं कान संतृप्त करून घेतो आहे. या भौतिक तृप्तीबरोबरच सत्य, सौंदर्य, न्याय, नीति इत्यादी मूल्यांच्या जोपासनेनं अंतःसमृद्धीचं अंतिम सुख साधतो आहे. हे सर्व साधण्याकरिता किती साहसं करावी लागतात, किती धोके पत्करावे लागतात, किती त्याग करावा लागतो. पण त्यातच माणसांना मोठ्यात मोठं सुख वाटतं. तेच तर माणसांचं खरं जगणं.

**मृत्यूला हुलकावण्या**

असलं साहसी जीवन जगणारा माणूस वयानं कितीहि वृद्ध झाला तरी मरेपर्यंत तो तरुणच असतो. तो मृत्यूला कधीहि भ्याला नाही, म्हणजेच मृत्यूला त्यानं जिंकलं. तो मेला म्हणजे मृत्यूच्या नाकावर टिच्चून ज्या अज्ञातातून तो आला त्या अज्ञातात तो हंसत हंसत परत गेला. अकाली वृद्ध झालेले काही लोक या मृत्युंजयांना केव्हा केव्हा विचारतात, 'कशाला बुवा तुम्ही ही साहसं करता कुणाला ठाऊक! मिळते ती भातभाकरी खाऊन तुम्हाला सुखानं घरी रहाता येत नाही काय?'

या प्रश्नाला उत्तर देताना हे साहसी लोक म्हणतात, 'तुम्ही सुखाचं म्हणता ते आपणाला जगणंच वाटत नाही, बुवा! अहो ते मरणं! एका इंग्रजानं म्हटल्याप्रमाणं पाळण्यापासून स्मशानापर्यंत आपणच आपली काढलेली एकाकी प्रेतयात्रा! मृत्यूला क्षणोक्षणी हुलकावण्या देत जीवनाचे अनन्यसाधारण उत्कष्ट अनुभव घेणे हेच आमचं जगणं.'

एक मजेदार गोष्ट मला आठवते. तेनसिंग हिलरीप्रमाणेच हिमालयाचं एक उंच शिखर जिंकून आलेला एक गिर्यारोहक आपले चित्तथरारक अनुभव सांगत होता. ते तुटन वहात जाणारे बर्फाचे कडे, माणसाना पाल्यापाचोळ्यासारखे उडवून नेणारे सोसाट्याचे वारे, ती हाडांना भेगा पाडणारी थंडी वगैरे, वगैरे हे वर्णन ऐकता ऐकता गळ्याभोवती लोकरीचा गळपट्टा लपेटलेल्या श्रोत्यांपैकी एक मध्यमवयस्क गृहस्थ जागच्या जागी हुडहुडू लागले! त्यानी त्या गिर्यारोहकाला मध्येच थांबवून काकुळतीच्या स्वरात एकदम विचारलं, 'पण तुम्ही हा त्रास घेता कशाला ? वरच्या मजल्यावर मिळणारी जागा सोडून मी तळमजल्यावरची जागा पसंत केली.' त्यावर तो गिर्यारोहक हंसून म्हणाला, 'महाराज, तळमजल्यावरच्या खोलीत बसून गटाराची घाण घेण्यात नि गल्लीतला धूळ धुरोळा पहाण्यात तुम्हाला सुख वाटत असेल; पण सर्व प्रकारचा त्रास सोसून







एकदा त्या शिखरावर पोहोचल्यानंतर निसर्गाचं जे रुद्ररम्य, अलौकिक दृश्य दिसतं त्यानं मिळणाऱ्या नेत्रसुखापुढं, नि महाशक्तिशाली निसर्गाचं आव्हान यशस्वीपणे स्वीकारल्याच्या आत्मसुखापुढं तो सर्व त्रास त्रासच वाटत नाही! 'क्षण एक पुरे प्रेमाचा, वर्षाव पडो मरणांचा!' असं म्हणणाऱ्या गडकऱ्यांच्या, विजेच्या प्रेमात पडलेल्या वृक्षासारखीच, काही माणसाची जिद्द असते.

## खाणे, पिणे किती कठीण गोष्ट!

हे झालं जीवनाच्या नेहमीच्या रहाटगाडग्यातून बाहेर पडून काहीतरी असामान्य अनुभव घेऊन पहाणारांचं जगणं. पण साधं, सामान्य, हातातोंडाची गाठ पडण्याकरिता जगणं हेच काही माणसांच्या बाबतीत एक महान् साहस होतं. त्यांच्याहि जीवनात काही कमी उत्कटता नसते. त्यांचीहि जिद्द मला कमी वाखाणण्यासारखी वाटत नाही. तोहि मृत्यूशीच केलेला सामना असतो. आफ्रिकेतल्या आतापर्यंत अज्ञात असलेल्या काही प्रदेशांचं जीवन दाखविणारा एक चित्रपट मी नुकताच पाहिला. त्यात केवळ दुसऱ्या दिवसापर्यंत जगण्याकरिता माणसांना निसर्गाशी केवढा अचाट झगडा करावा लागतो ते पाहून मी स्तंभितच झालो. त्या विशिष्ट वैराण प्रदेशात कित्येक मैल पायपीट केल्यानंतर काही कंदमुळं किंवा खाण्यासारखा पाला पाचोळा मिळतो. नदी आहे, पण तिच्यात मगरीसुसरींचा इतका अफाट सुळसुळाट आहे की पाण्याकरिता काठाच्या जवळपासहि कुणी जाऊ शकत नाही. तरीहि तीरकामटचानी किंवा लांबलचक भाल्यांनी सुसरीची शिकार हे लोक करतात. तिचं कच्चं मांस तिच्या भोवती जमून बायका, पोरं, पुरुष कचा कचा खातात! एखादे दिवशी ही शिकार मिळाली की तो दिवस सणासुदीचा मेजवानीचा! पण पाण्याकरिता तिथल्या बायका करीत असलेल्या खटाटोपाला जगात तुलना नसेल. मैलन् मैल पसरलेल्या त्या वैराण प्रदेशात काही ठिकाणी मध्येच थोडी खोलगट असलेल्या अळवासारख्या रुंद पानांची झुडपं उगवतात. त्यात रात्री ठिबकलेल्या दंवबिंदूमुळे ओंजळभर पाणी जमलेलं असतं. त्या आफ्रिकी स्त्रिया सकाळीच उठून उन्हाची तिरीप येण्यापूर्वी बाहेर पडतात, नि कित्येक मैल पायपीट करीत हे ओंजळ ओंजळ पाणी सुकलेल्या फळांच्या लांब तोंडाच्या भांड्यात नाजुक हातांनी काळजीपूर्वक गोळा करतात!




## 'सांडा' तुकाराम

पण साहसी जीवन उत्तुंग पर्वतांची शिखरं पादाक्रान्त करण्यात किंवा अवकाशयानातून चंद्रलोक गाठण्यातच आहे, असं मात्र मुळीच नाही. तळमजल्यावरल्या खोलीत किंवा चंद्रमोळी झोपडीत राहूनहि मानवजातीतल्या काही पुरुषोत्तमांनी अचाट साहसी कर्मे केली आहेत. त्याना मी विचारक्षेत्रातले कृतिवीर म्हणतो. प्राणांची कुरवंडी करून, सर्वस्वाचा त्याग करून या वीरांनी पर्वतापेक्षाहि उंच विचारांची शिखरं गाठली आहेत. पुष्कळांना वाटतं की विचारवंत किंवा कवि काही कृति करीत नाहीत. महान् विचाराचा शेवटपर्यन्त पिच्छा पुरवणं किंवा एखाद्या उत्कृष्ट जीवनानुभवाला शब्दाकार देण्याकरिता रात्रंदिवस धडपडणं ही महान् कृति नाही काय? दोन्ही डोळे गेले तरी भाषेत नि तंत्रात क्रांति करून कादंबरीच्या क्षेत्रात नवी क्षितिजं गाठण्याकरिता सतरा वर्षं एक कादंबरी लिहीत बसलेला श्रेष्ठ कादंबरीकार जेम्स जॉइस्, संसारसुखाचा विचारहि मनात न आणता रात्रंदिवस गणिते करून गुरुत्वाकर्षणाचा शोध लावणारा न्यूटन, महिनेच्या महिने खोलीत कोंडून घेऊन विश्वाच्या व्यासाचं गणित करणारा आयन्स्टाईन् किंवा जीवनानुभवांची अभंगवाणी करण्याकरिता 'विटबिटी पोरे रांडा' असं म्हणत 'सांडा' झालेला आमचा तुकाराम हे साहसी कृतिवीर नाहीत काय?

## विचारवंताची पत्नी

कुणीतरी म्हटलंय्, की मोठी धामधुमीची कृति करण्यापेक्षाहि आपल्या मनात आलेल्या एखाद्या अभिनव, क्रांतिकारी विचाराला तोंड द्यायला माणसाला अधिक धैर्य लागतं. पुष्कळ वेळा धामधुमीच्या कृतीत स्वतःला चोवीस तास गुंतवून ठेवणारी माणसं भित्रीच असतात, त्यांना आपल्या अंतःकरणातल्या घडामोडीना तोंड द्यायचं धैर्य नसतं म्हणून त्यानी कृतीच्या क्षेत्रात पलायन केलेलं असतं.

याच्या उलट मनातल्या विचाराचा पिच्छा पुरविण्याकरिता सुखी संसाराचा त्याग करून शांतपणे विचार करायला योग्य अशा अरण्याचा आश्रय घेणारे विचारवीर असतात. 'बृहदारण्यकां'चा कर्ता याज्ञवल्क्य वर्षानुवर्षं जीवन, आत्मा, मृत्यु यांचा विचार करीत होता. बरोबरीनं वादविवाद करणारी शास्त्रविद्यापारंगत अशी मैत्रेयी त्याची सह-धर्मचारिणी होती. तरीहि संसाराच्या गडबडीत ज्या विचाराचा शोध आपल्याला करायचाय् तो पुरा करता येणार नाही अशी खात्री पटल्यावर तो संसार सोडून अरण्यात जायला उद्युक्त झाला. तेव्हा 'आम्हाला सोडून जाऊ नका हो!' म्हणून रडारड करण्याऐवजी मैत्रेयी त्याला शांतपणे म्हणते, 'तुम्ही अरण्यात जा तुम्हाला जायलाच पाहिजे. पण त्यापूर्वी तेवढं मृत्यूचं गूढ काय आहे ते मला विशद करून सांगा.'

या पतीचं कौतुक अधिक करावं की पत्नीचं अधिक करावं तेच मला समजत नाही. जगण्यात साहस हवं ते असं जीवन जगण्याकरिता.

● ● ●








अनुक्रमणिका



वसंत पुरुषोत्तम काळे

# सुवर्णतुला



**नारायण....नारायण....! कृष्णराव लफड्यांतून सुटले कसे? तोही एक मजेदार किस्सा....म्हणून तर इतके दिवस (गेला सबंध महिना) वाट पहाणे भाग पडले.... नारायण....नारायण!**

—**सत्यभामेच्या** चेहऱ्याकडे पाहूनच दनायतनं काय प्रकार असावा ते जाणलं.

" फारच मनस्ताप झालेला दिसतोय्."

" मनस्ताप आम्हा बायकांच्या पाचवीलाच पुजलेला असतो."

" साहेबांशी तुम्ही चांगल्याच भांडलेल्या दिसताय्."

" भांडण्यासाठी तरी 'हे' घरी यायला हवेत ना?"

"म्हणजे? कृष्णराव कालपासून घरीच नाही आले?—नारायण, नारायण."

"घरी म्हणजे, ह्या घरी नाही आले."

"बरं, बरं, ह्या घरी नसतील तर थोरल्या घरी असतील. तुम्ही इंटरकॉम्‌वरून विचारलं असेलच म्हणा."

"मी नाही वापरत कधी फोन. कनेक्शनहि तोडून टाकलं काल."

"हां हां! एवढा राग बरा नाही. त्यांच्या मागं नाना व्याप. नाही आले एक रात्र इकडे; त्यात काय मोठसं?"

"ठेवलेत नाना व्याप. गेले असतील कॅडिलॅकमधून, तिला घेऊन खंडाळ्याला किंवा लोणावळ्याला."

"छे छे, तुम्ही फार रागावता. तुमचा हा ब्लॉक साहेबांनी मुद्दाम एअर-कंडिशंड करविला, फ्रीज घेतला, पण तरी तुमचा राग काही कमी नाही होत!" —दनायत हे म्हणताना सुद्धा हसला. चाणाक्ष सत्यभामेनं त्याचं ते अर्थपूर्ण हास्य लगेच ओळखलं. आणि ती तावातावानं म्हणाली,

"पहा पहा, तुमच्या ह्या बोलण्यातहि खोच आहेच."

"नारायण नारायण. नाही म्हणजे वहिनी, त्या चतुर सारंगाची चतुराई मी जाणली म्हणून हसलो, पण तू मात्र मनात काही आणू नकोस."

"सांगा आधी काय ते."

"मी सांगत नाही, पण एक शंका विचारतो. खोली एअर-कंडिशंड कां करतात?"

"कां म्हणजे? —मुंबईच्या हवेला ती आवश्यक गोष्ट आहे."

"ते निमित्त आपलं साहेबांनी तुझ्यासारख्या भोळ्या बायकांना

सांगावं. कृष्णरावांचा निव्वळ तेवढाच उद्देश असेल नाही असं मला वाटत."

"आपल्याला काय वाटतं?"

"छे छे, तो केवळ तर्क. माझा तर्क!—मी तो सांगायचा आणि तो तर्क खरा मानून तू कृष्णाशी भांडायचं हे नाही मला पटणार. आग्रहच असेल तर सांगतो. खोली एअरकंडिशड केली की बाहेरचे आवाज ऐकू येत नाहीत."

"त्याचा काय संबंध?"

"किती तू भोळी?—अग रुक्मिणीचा ब्लॉक पलीकडेच आहे ना?—तिथे साहेब काय बोलतात ते तुला कळू नये हाच तो हेतू."

—सत्यभामा त्वेषानं पण दुःखित स्वरात म्हणाली,

"फसले हो फसले! भावोजी, तुम्हीच मला सावध केलीत. आता येऊ दे स्वारी. पहातेच, माझ्यासमोर आता कशी लपवा-लपवी करतात ते. थोरल्या बाईंची ऐट पण मला एकदा उतरवायची आहे. साधेपणाचा डौल मिरवतात. खरंच, भावजी, मला असा एखादा उपाय सांगा की स्वारी संपूर्ण माझ्या ताब्यात राहील; आणि रुक्मिणीचा तोराहि उतरेल. स्वारीवर मी किती प्रेम करते हे एकदा मलाहि दाखवायचं आहे."

—दनायत मानभावीपणानं म्हणाला,

"स्तुत्य, स्तुत्य!—वहिनी तुमचा हा विचार योग्य आहे. नव-ऱ्यावरची भक्ती व्यक्त करण्यासाठी आर्य स्त्रीनं प्रयत्नशील रहाणं हे केव्हाहि उचितच आहे."

"मग मी काय करू?"

"सत्यभामे, नवरा संकटात असताना, नवरा गरीब असतानाच बायकोची कसोटी लागते.—स्त्रियः परीक्षातु निर्वने पुंसि!—असं शास्त्रवचन आहे. तेव्हा तू कृष्णावर संकट आण. हे वैभव—जर काही काळ नाहीसं झालं तर तू त्याला साथ देशील. पण रुक्मिणी-देवींचं तसं नाही. त्या ऐषारामात वाढलेल्या. आपत्काली त्यांची आपोआप कसोटी लागेल आणि तू परीक्षेत यशस्वी ठरशील."

"पण तेवढ्यासाठी मी ह्यांनाच संकटात लोटायचं?"

"काही वेळेपुरतं!

"मग काय करू?"

"सांगतो. तू इन्कमटॅक्स ऑफिसला गुपचुप फोन कर व साहेबांच्या मिळकतीची, वैभवाची ऑफिसला माहिती दे."

"छे, प्रत्यक्ष कृष्णदेवांसारखे ज्याचे चरित्र त्याला कोण मिळकतीचा हिशोब विचारणार?"

"कोण म्हणजे? खुद्द सरकार विचारेल. तुझे नाथ जरी कृष्ण असले तरी हे आहे रामराज्यात. ह्या रामराज्यात खुद्द राम सुटणार नाहीत तिथे कृष्णाची काय कथा? समजलं?— आणि कृष्णराव हे खरे कृष्ण नव्हेत. नांवाचे कृष्ण.

"मग पुढे काय?"

"मग साहेबांची कसून चौकशी होईल. इन्स्पेक्टर मागे लाग-तील. अनेक वर्षांचा टॅक्स भरायचा राहिला असेल तर हे वैभव काही काळ तुम्हाला पारखं होईल. रुक्मिणीचा निभाव लागायचा नाही, पण तू मात्र श्रेष्ठ ठरशील. मग काय तो नंदनंदन तुझा एकटीचाच!"

—फोन करण्यासाठी सत्यभामा आनंदून धावलीच आणि नारायण नारायण म्हणत दनायत बाहेर पडला.

—कृष्णरावांची आणि दनायतची लिफ्टजवळच गाठ पडली. कृष्णांनी हसून विचारलं,

"सर्व काही क्षेम आहे ना?"

"कृष्णा, तुझ्या राज्यात की बाहेरच्या राज्यात?"

"बाहेरच्या राज्यात. माझ्या राज्यात क्षेम असणारच. अरे पण हो, 'नारद'! तू नुकताच माझ्या घरातून बाहेर पडला आहेस. तेव्हा माझ्या राज्यात आता सर्व क्षेम असेलच असं नाही."

"अशीच, अशीच माझी अकारण बदनामी होते नेहमी. तूहि माझी गणना त्या नारदाबरोबर करतोस. आता सांगतोच सगळं. काल रात्रभर तुम्ही घरी नव्हतात म्हणूनच वातावरण बिघडलं आहे. घरी काहीहि सांगा पण मला मात्र खरं काय तेच सांगा. काल आपण कुठे होतात?"

"खूप वर्षांनी माझी बालमैत्रिण राधा ही अमेरिकेहून इकडे आली आहे. तिच्याबरोबर मी 'नटराज' हॉटेलात होतो. आणि ती परत अमेरिकेला जाईतो मी तिकडेच रहाणार आहे."

"अहाहा, धन्य ती राधा. राधा म्हणजे जणू प्रत्यक्ष भक्तीच! कृष्णा, तिला माझे नमस्कार सांग."

"जरूर. पण आता माझ्या दोन्ही भार्या काय म्हणताहेत तेवढं मला सांगा."

"ते आपण प्रत्यक्ष अनुभवाच आता."

—लिफ्टचं चोवीसाव्या मजल्याचं बटण दाबता दाबता कृष्ण-राव मनाशी म्हणाले,

"भार्यावन्त कृष्णा, आता धैर्यवन्त हो."

★ ★

—लॅच–कीनं दरवाजा उघडल्याबरोबर समोरचं दृश्य पाहून काही काळ कृष्णरावांना संमिश्र–भावनांचा धक्काच बसला. रुक्मिणी आणि सत्यभामा एकत्र?—एअर–कण्डीशंड खोलीत त्या दोघींना एकत्र पाहून कृष्णासमोर थोडा पेच उभा राहिला. त्या दोघींना स्वतंत्रपणे संभाळणं सोपं होतं पण एकत्र संभाळणं तितकंच कठीण होतं. आता इलाजच नव्हता!

"नाथ, काल आपण कुठं होतात? इथं नव्हतात." सत्यभामा.

"तिकडेहि नव्हतात." रुक्मिणी.

"फोन तरी करायचात." सत्यभामा.

"शोफरबरोबर निरोप पाठवायचात." रुक्मिणी.

"समजलं, तुम्हाला मोटार घेतली ते. पाहिली कालच. मी बसस्टॉपवर उभी होते, आपण गेलात मिरवीत."

"अहाहाहा, मिरवीत म्हणे. जणू काही वरातीत मिरवतात तशी काय मोटार सजवली होती वाटतं?—तुम्हालाच मिरवायची हौस. सगळे अंगावरचे दागिने, परवाचा तन्मणी, हेअरस्टाईल






सगळचांना दिसायला हवी म्हणून घरची गाडी असताना, मुद्दाम मिरवत बसने जाता तुम्ही. पुनः कुणी विचारलं की सांगायचं, गाडी किनई थोरल्या बाईची. माझी नाही."

—"होय वरं,बाई, मला मिरवायची हौस. तुम्हाला बघवत नाही ना म्हणून दाखवते जगाला."

—त्या दोघींची आपापसात अशी जुंपलेली पाहून कृष्णराव खूष झाले. त्या दोघींच्या संयुक्त माऱ्यापासून ते आपोआप बचावले होते. पण त्यांचं हे समाधान फार थोडा काळ टिकलं. सत्यभामेनं त्यांचा उजवा हात धरला आणि रुक्मिणीने डावा.

"माझा हा पाणउतारा पाहून तुम्हाला बरं वाटतय् ना?"—सत्यभामेनं विचारलं.

"आधी माझ्याशी बोला." —रुक्मिणीनं ठणकावलं. तेवढचात त्या दोघींपेक्षा आवाज चढवून कृष्णराव म्हणाले, "थांबा. मी आता कुणाशीच बोलणार नाही. रोज रोज रूसे, त्याला कोण पुसे?—इथं रहातहि नाही मी इथं. तुमच्या त्या रोजच्या कटकटी ऐकून मीच चार दिवस जाणार आहे हॉटेलात."

—तो रूद्रावतार पाहून दोघी घाबरल्या. नमतं घेत सत्यभामा म्हणाली,

"एकटेच जाणार हॉटेलात?"

"नाही. पाहुण्यांची व्यवस्था करायला."

"हे काय, तुमचे पाहुणे ते आमचे पाहुणे नाहीत का?—" सत्यभामा म्हणाली.

"मागं सुदामकाकांची सेवा नाही का आम्हीच केली?"—रूक्मिणी म्हणाली.

"हवं तर पाहुण्यांना माझ्या ह्या एअरकण्डिशंड हॉलमधे राहू दे. थोरल्या घरी नको." —सत्यभामा रुक्मीणीला खिजवत म्हणाली.

"आता कसं सांगू?—पाहुणे म्हणजे—एक स्त्री आहे."

—दोघीहि दणकल्या. मग पिसाळल्या. सत्यभामा चिडून म्हणाली,

"आणि त्या पाहुणीची बडदास्त तुम्ही ठेवणार?—नांव तरी कळ दे त्या महामायेच?"

—कृष्णराव भारावून म्हणाले, "तिचं नांव?—छे. तिला नांवच नाही. ती प्रत्यक्ष भाववृत्ती आहे. चांदणंहि तिच्यापुढे कमी शीतल ठरेल. तिच्या केवळ स्मरणानं दशादशा सुगंधित होतात. ती साक्षात् भक्ती आहे. ती शक्ती आहे. जिच्यापुढं आदरानं नतमस्तक व्हावं अशी ती एक देवता आहे. तिचं नांव आहे "राधा".

* *

पण राधेच्या सात्विक, कोमल सहवासाचं सौख्य कृष्णरावांना जास्त लुटताच आलं नाही. कारण सत्यभामेनं त्यादिवशी केलेल्या फोननं सरकार दरबारी जोरजोरात चक्रं फिरू लागली होती. कृष्णरावांच्या गैरहजेरीत अनेक लोक घरी येऊन चौकशी करून गेले. सत्यभामेनं काहीहि लपवून न ठेवता सगळी माहिती हिरीरीनं, फुगवून सांगितली होती.

प्रकरण पुरतं जेव्हा पेटलं, खुद्द त्या चौकशीच्या सोहळचानं, अधिकाऱ्यांच्या दमदाटीनं आणि खोलात शिरून माहिती काढण्याच्या पद्धतीनं तेव्हा रुक्मिणी आणि सत्यभामा देखील घाबरून गेली. त्यातच भर म्हणजे रुक्मिणीनं तिला हडसून-खडसून सगळा मामला विचारून घेतला, आणि दनायतच्या कपट-नाटकात सत्यभामा कशी पुरेपूर फसली हे तिला दाखवून दिलं. आपल्या मूर्खपणापायी कृष्णराव कचाटचात सापडला आहे हे सत्यभामेला आता कळलं होतं, पण पुनः चांगूलपणा रुक्मिणीलाच मिळणार होता ह्या बिचारापायी ती जास्त हवालदील झाली होती.

आणि ही सर्व परिस्थिती जोखून दनायतनी आपला पवित्रा एकदम बदलला. जणू काही आपण सर्व जिंकलं आहे, कृष्णराव, रुक्मिणी, सत्यभामा—ही आपल्या अंकित आहेत, असा भाव त्यांच्या वागण्याबोलण्यात, बसण्याउठण्यात व्यक्त होत होता. कृष्णराव जास्त जास्त बिकट परिस्थितीत सापडत होता. आणि ह्याला कारणीभूत होती सत्यभामा!—कृष्णराव दोन्ही घरी आता आठ-आठ दिवसात फिरकत नव्हते. शेवटी मोठचा मिनतवारीने सत्यभामेनं दनायतला जवळ जवळ पकडूनच आणलं घरी!

"भावजी, करायला गेले एक आणि झालं भलतंच. हे मला आणखीनच दुरावले."

"छे छे, सत्यभामे, अंतर वाढले की ओढ वाढते. विरह वाढला की मीलनाची गोडी वाढते. थोडी कळ सोस."

"पण आता कसं व्हायचं?"

"आता कृष्णरावांवर होईल फिर्याद. चौकशी—न्यायालयीन चौकशी सुरू होईल. तिथं जो काय निकाल लागेल तो."

"म्हणजे कोर्ट आलं. वर्तमानपत्रात रिपोर्ट येणार. म्हणजे बदनामीच की."

## एक महान् देश आणि त्याची तितकीच महान (मूर्ख) जनता




संस्कार !

"त्याला काय इलाज?—हाच तो कसोटीचा काळ."

"छे छे, हे थांबवायला पाहिजे सगळं."

" ते आता कठीण आहे."

"तुम्हाला काहीच कठीण नाही. तुम्ही नारदाप्रमाणेच आहात."

"अग एकटा मी काय करणार?—त्याच्यामागे कुणीतरी हवं, पैसा हवा."

"मी देते म्हणाल तेवढा पैसा. किती हवेत?—पाच हजार? दहा हजार?"

—दनायत नुसता हसला.

"हसू नका, सविस्तर सांगा."

"सत्यभामे, पाच दहा हजारांनी काय होणार?—किती तरी अधिकाऱ्यांचे हात दावावे लागतील. संत्र्यापासून मंत्र्यापर्यंत सर्वांची तोंडं गप्प करायची म्हणजे खायचं काम नाही. मागे जशी पुराणात श्रीकृष्णाची तुला केली होती, तशी तुलाहि करावी लागेल."

"एवढंच ना?—मग कराच त्यांची तुला. माझं हे वैभव पहा आणि पहाच मी जिंकते की नाही. स्वारींना नाही सोडवून दाखवलं तर नाव बदलीन. सत्यभामा म्हणजे सत्यभामा."

* *

—सत्यभामेच्या ब्लॉकमध्ये तुला उभी राहिली. रुक्मिणी, सत्यभामा, कृष्णराव, दनायत आणि इन्कमटॅक्सचे दोन ऑफिसर—एवढ्यांसमोर कृष्णराव एका पारड्यात बसले. प्रथम रुक्मिणीने व सत्यभामेने आपल्या अंगावरचे दागिने त्यात टाकले. पण पारडं तसंच होतं. सत्यभामेला मनातून खात्री होती की नुसता तो फ्रीज जरी पारड्यात ठेवला तरी काम भागेल.

—फ्रीज ठेवला—आणि पारडं तसूभरहि हाललं नाही.

मग घरातल्या एकेक वस्तू येऊन पडू लागल्या. रुक्मिणीने सगळ्या ब्लॉकच्या किल्ल्यांचा जुडगाच त्यात टाकला. पण काही नाही!—त्यानंतर नॅशनल सेव्हिंग सर्टिफिकीट्स —फिक्स डिपॉझिटस् —युनिट ट्रस्ट—सर्व सर्व टाकण्यात आलं, पण छे. शेवटी टाळी वाजवून, सत्यभामा म्हणाली, "मी आता घरखर्चातून वाचवलेले पैसे त्यात टाकते."

—मग सत्यभामेनं पैशांनी, नाण्यांनी भरलेले दोन हण्डे त्यात ठेवले. पण काही नाही. दनायत म्हणाला,

"भामिनी, ते ब्लॅकचे पैसे. ते जेव्हा व्हाईट होतील तेव्हाच त्याला वजन यायचं."

—रुक्मिणी हसली, पण मनातून ती धास्तावली होती. हे असं कां व्हावं हेच तिला कळत नव्हतं. तेवढ्यात बेल वाजली. पहातात—तो राघा.

कृष्णरावांना हायस वाटलं. तेहि त्या सोहळ्याला कंटाळले होते. भान विसरून ते उठायला लागले. तेवढ्यात ते दोन ऑफिसर्स व दनायतनं त्यांना खडसावलं.





अनुक्रमणिका

तो प्रकार पाहून राधा दिङ्मूढ झाली. सत्यभामा फुरंगटून बाजूला उभी होती. पण आपल्याला आता केवळ राधाच वाचवू शकेल हे रुक्मिणीने जाणलं होतं. राधेच्या जवळ जात रुक्मिणी म्हणाली,

"राधामाई, कृष्णरावांचं पारडं वर येतंच नाही."

—इकडे ते लालचावलेले दोन ऑफिसर्स मात्र खूष दिसत होते. राधा हळूच हसली व रुक्मिणीला म्हणाली,

"रुक्मिणी, अग तूहि या नाटकाला फसलीस?—या सगळ्या बाह्य क्षणभंगुर ऐहिक सोहळ्यावर भाळलीस?—तुलाहि निद्रा आली का?—अग कृष्णराव हा मूर्ती असेल तर तू साक्षात् शक्ति आहेस त्याची. शक्ती ही नेहमी जागृत हवी. शक्ती जर मायेनं वेढली गेली तर जगाचं कसं व्हायचं? डोळे मीट. ध्यान कर. अंतरात्म्यात दडून बसलेल्या त्या कृष्णाला हाक दे. तुझ्याजवळच आहे तो. आणि मग कृष्णरावांनी प्रेमानं दिलेली एक लहानशी वस्तू आठव. त्यानंहि काम होईल.

रुक्मिणी धावतच गेली आणि दोन मिनिटात परतली. तिच्या हातात एक छोटसं हस्तीदंती गुलाबाचं फूल होतं. ते फूल पहाताच राधा म्हणाली,

"हीच, हीच ती दिव्य प्रेमाची खूण. तुला आठवतं का रुक्मिणी कॉलेजच्या गॅदरिंगमध्ये कृष्णरावांनी तुला जेव्हा प्रथम पाहिलं त्यावेळी त्यांची काय अवस्था झाली होती ते?"—

रुक्मिणी हलकेच म्हणाली, "जी अवस्था माझी झाली होती, तीच त्यांची!"

—तुला योग्य ती प्रेमवस्तू देता यावी म्हणून मी आणि कृष्णराव त्यादिवशी क्रॉफर्ड मार्केटपासून कुलाब्यापर्यं चालत चालत गेलो होतो. पण मनासारखं काही मिळेचना. शेवटी कुलाब्याहून पुन: परतलो. तुला देण्यासाठी मला एखादी गोष्ट आवडली तर ती त्यांना आवडायची नाही आणि त्याना बरी वाटलेली मला योग्य वाटायची नाही. शेवटी खादी—ग्रामोद्योगमध्ये हे हस्तीदंती गुलाबाचं फूल मिळालं. त्यातला अत्तराचा वास कधीहि जायचा नाही असं सेल्समन्नं सांगितलं."

—रुक्मिणीनं चटकन् सगळं आठवून त्यातला तो अत्तराचा फाया बाहेर काढला मात्र, सर्वत्र घमघमाट पसरला. एवढ्या वर्षांनंतरहि त्यातला वास तसाच होता.

रुक्मिणीनं राधेला विचारलं,

"ह्या एवढ्याशा फुलानं काय होणार?—

राधा म्हणाली, "हां हां—असं म्हणू नकोस. जी दिव्य प्रेमाची, निस्वार्थी प्रेमाची खूण असते त्यात वस्तूला महत्व नसतं. संकेताला महत्व असतं. हे जरी कलीयुग असलं तरी प्रेम, माया, श्रद्धा, सत्प्रवृत्ती त्यांची मूल्ये तीच उरली आहेत. हे हस्तीदंती गुलाबाचं फूल तुला सामान्य वाटतय् पण त्याची बरोबरी त्या "तुळशीच्या पानाबरोबर" आहे असं समज. तुला पडताळा पहायचाच असेल तर हे फूल तू त्या अधिकाऱ्यांना दाखव नुसतं."

—रुक्मिणीला ते पटलं. ती पुढे होत म्हणाली,

"आता माझ्याजवळ काहीहि उरलेलं नाही. हे एक शेवटचं फूल आहे. तेवढीच शेवटची मौल्यवान वस्तू मी देते."

रुक्मिणीच्या हातातलं ते फूल पहाताच ते दोन ऑफिसर्स पुढे सरसावले. त्यातला एकजण म्हणाला,

"बस् बस वहिनी, त्याच एका वस्तूची आम्ही एवढा वेळ वाट पाहिली. सत्यभामाबाई, तो टेपरेकॉर्डर, रेकॉर्ड प्लेअर, फ्रीज, सगळं परत न्या आत. आम्हाला एवढं पुरेसं आहे. एवढं एकच हे हस्तीदंती फूल आम्ही नेतो आणि कृष्णरावांना सोडून देतो.

—सत्यभामा आनंदून गेली, पण रुक्मिणीचा चेहरा उतरला. ती म्हणाली,

"राधा, अख्खी संपत्ती गेली असती तरी चाललं असतं, पण माझी ती शुद्ध प्रेमाची खूण, ते फूल जायला नको होतं, पण आता काही इलाज नाही, आजवर कृष्णरावांच्या प्रेमावरच मला प्रतिक्षणी आनंद लाभत होता. तेव्हा त्यानी दिलेल्या त्या प्रेमभेटीनं जसं मला आजवर तारलं त्याच भेटीनं त्यांनाहि आज बंधनमुक्त केलं. दनायतभाऊजी, त्या अधिकाऱ्यांना द्या हे फूल; आणि त्यांना सांगा, की या वस्तूची विटंबना कधी होऊन देऊ नका. लोकांच्यावर प्रेम करा; त्यांच्या पैशावर डोळा ठेवू नका."

—इकडे सत्यभामा मात्र अवाक् झाली होती. ती तो प्रकार पहात राहिली. रुक्मिणीनं ते फूल पारड्यात टाकलं आणि काय आश्चर्य?—जसं पुराणकाली घडलं, तसंच नवल!—कृष्णरावांचं पारडं वर गेलं. पण त्या अधिकाऱ्यांनी सुतळीच्या तोड्यालाहि हात न लावता, फक्त ते फूल उचललं. मग मात्र सत्यभामेला शंका आली. सरकारी नोकर आणि संधी मिळूनहि, धोका नसताना पैसा खात नाही ह्याचा अर्थ काय?—शुद्ध प्रेम—वगैरे पवित्र भावना ही माणसं कधीपासून मानायला लागली?—सत्यभामा मग दनायतला म्हणाली,

"भावजी, काहीतरी भानगड आहे. हे दोघं कोण आहेत?—हे कशावरून इन्कमटॅक्स ऑफिसर्स आहेत? त्यांचं आयडेन्टीफिकेशन दाखवा वरं."

त्यावर दनायत हसून म्हणाला.

"वहिनी हुशार आहात तुम्ही. हे सगळं खोटं आहे. असं घडलेलंच नाही. तुम्हांला खरं प्रेम म्हणजे कसं असतं हे दाखवण्यासाठी हे नाटक केलं होतं आम्ही. आता मीहि त्या खऱ्याखुऱ्या नारदाप्रमाणे संदेश देतो की, ऐहिक सुखोपभोग भोगत असतानाहि "श्री चं" अधिष्ठान हवं, हाच तो मूलमंत्र. नारायण....... नारायण....

●●●



## बाई मी कसं सांगू ?

वेस्ट—इंडिज खेळाडू मात्र अस्सल विनोद—बुद्धीचे आहेत. विनोद करणे जरी त्याना जमत नसले तरी विनोद त्यांना समजू शकतो. वेस्ट—इंडिजचा संघ ऑस्ट्रेलियाच्या दौऱ्यावर गेला होता तेव्हाचं हे 'सॅंपल' ! ज्या बसने ते सर्व वेस्ट—इंडिज खेळाडू प्रवास करीत होते त्याच बसमध्ये एक जोडपं होतं. ह्या खेळाडूंना पाहून नवरा बायकोला म्हणाला, "हे वेस्ट—इंडिजन दिसताहेत". यावर ती ललना म्हणाली, "ते बाई मी कसं सांगू? कारण माझ्या डोळ्यांवर 'गॉगल' आहे!'

—प्रेक्षक

# विनोदी क्रिकेट

—प्रा. सुरेश गजेंद्रगडकर



खिलाडू वृत्ती म्हणजेच क्रिकेट असे ज्याचे वर्णन, त्या खेळात विनोद निर्माण होणारे कितीतरी प्रसंग घडतात. बिल् रीव्हज्, चेस्टर, फार काय वेस्ट इंडिजचे काही खेळाडूसुद्धा विनोदी व हजरजबाबी असल्याची चुणुक दाखविणाऱ्या या काही झांकी !

**बिल्** रीव्हज् हा अशा त्याच्या हजरजबाबी व विनोदी वृत्तीमुळे Comedian of Cricket समजला गेला होता.

एकदा तो अंपायर असताना सेसिल् पार्किन् चेंडू टाकत होता. हर्बर्ट सट्क्लिफला बाद करण्याच्या इच्छेने त्याने एक चेंडू जोरात टाकला तो सट्क्लिफच्या पॅडवर आदळला. पार्किनने "हौज् दॅट्?" असा ओरडा केला. रीव्हज्ने नकारार्थी मान हलवली. "नाबाद कां दिलास?" त्याने विचारले. "चेंडू फार वरती होता" रीव्हज् उत्तरला. थोड्या वेळाने पुन: पॅडवर चेंडू आपटला. पुन: अपील नाकारण्यात आले. शक्य तेव्हढी गंभीर मुद्रा करून रीव्हज्ने उत्तर दिले, "फार खाली लागला!"

रीव्हज् अशी उत्तरे देण्यात फार पटाईत होता. एकदा मॅच सुरू होण्याच्या आधी एका खेळाडूने त्याला पाहून म्हटले "बिल् तू अंपायर आहेस पाहून फार आनंद झाला!" बिल्ने सटकन् उत्तर दिले, "मॅच् संपल्यावर तुझे हेच उत्तर असल्यास मला आनंद होईल!"

कधी कधी त्याला नवीन खेळाडूंची चेष्टा करण्याची लहर येई. एकदा एक नवीन पोरगेलासा खेळाडू कौंटी क्रिकेटमध्ये प्रथमच खेळत होता. मध्यमगति चेंडू टाकून त्याने बळी मिळवण्याचा यत्न केला. दरवेळी पॅडवर चेंडू आपटला की त्याने अपील "हौज् दॅट" असे करावे व बिल्ने नाकारावे. असे तीनचारदा घडल्यावर रीव्हज्ने त्याला जवळ बोलावून सांगितले "बाळ, कौन्टी क्रिकेटमध्ये नुसते 'हौज् दॅट्' केल्याने अंपायर निकाल देत नसतो. जरा आवाजात आदब आणून 'How is that Sir?' असे विचारावे. पुढल्या षट्कांचे वेळी पुन: पॅडवर चेंडू आदळला. आता खेळाडू खरा बाद झाला होता.

नवोदिताने संवयीप्रमाणे 'हौज् दॅट्'ची आरोळी ठोकली. मग आणि एकदम थांबून आदबीने म्हटले, "सर?" रीव्हज्ने किंचित् स्मित केले व बोट वर केले. त्याचा गैरसमज कधी दूर झाला कोण जाणे! रीव्हज्विषयी सर्वांचे मत असेच होते. त्याच्या सहवासात आलेल्या प्रत्येकाने तो काळ अत्यंत मजेचा गेला असेच लिहिले आहे.

**म्हाताऱ्या जिवाचे समाधान !**

हर्बर्ट सटक्लिफ् खेळत असताना, त्याच्यावर धावचीत बाद होण्याची पाळी आली होती परंतु काही क्षण आधी तो पोचल्यामुळे बाद झाला नाही. लांबून तो बाद झाला असेच वाटले असते. हे यॉर्कशायर वि. लँकेशायर ह्यांच्या सामन्यात घडले. त्यामुळे लँकेशायरच्या खेळाडूंना ते पटले नाही. त्यानी सामना संपल्यावर रीव्हज्ला विचारले, "तू सट्क्लिफ्ला कां औट दिला नाहीस?" रीव्हज्ने गंभीरपणे उत्तर दिले "त्याचे आजोबा १५० मैलावरून त्याच शतक पाहण्यास आलेले, अशा वेळी म्हाताऱ्या जिवाचे समाधान मी कसे घालवू? तुम्हीच सांगा!"

एकदा तर रीव्हज्ने एका तरुण खेळाडूची समजूत "हिरवळ ओली होती व तू फार वेळ त्याच्यावर खेळला असतास तर आजारी पडला असतास व तुझी आई मलाच बोलली असती म्हणून, तू बाद नसताना तुला मी बाद दिला!" असे सांगून काढली होती.

रीव्हज्ची खेळाकडे बघण्याची वृत्तीच मुळी गंमतीशीर होती. त्या खेळाच्या गंभीर बाजूकडे गांभीर्याने पाहत, उरलेल्या पैलूंची चेष्टा करत, हंसत, दिल्खुलास वृत्तीने त्याने क्रिकेटमध्ये नांव अमर केले.

फ्रँक चेस्टर व रीव्हज् एकत्र अंपायर होते. आल्फ् गोव्हर चेंडू फेकण्यास सुरुवात करणार होता. त्यावेळी "फ्रँक, गोव्हरला मी बरेचवेळा 'नो बॉल्' दिल्यामुळे तो भडकलाय्. तर तूंच सुरुवातीस त्याच्या बोलींगला अंपायर हो!" असे रीव्हज्ने सांगितले. पुढे काही वेळाने बोलींग बदलून पुन: गोव्हर आला त्यावेळी नेमका रीव्हज् अंपायर होता. गोव्हरचा स्वेटर हातात धरून त्याने

गुडघे टेकून आभाळाकडे बघत प्रार्थना करण्याचा अभिनय केला. त्यामुळे बराच वेळ खेळाडूंमध्ये खसखस पिकली.

## यांना धावणेही माहीत नाही !

एकदा ओव्हलवर खेळ चालू असताना दोघे फलंदाज धांव काढण्याचा प्रयत्न करतेवेळी चेंडू दोन तीन वेळा चुकीचा फेकला गेला. परंतु ते दोघे फलंदाज इतके गोंधळले होते की पिच्च्या ह्या टोकापासून त्या टोकापर्यंत कधी दोघे एकाच दिशेने तर कधी उलट सुलट असे धावत होते. शेवटी जेव्हा बेल्स् उडवल्या तेव्हा दोघेहि रेषेच्या बाहेर होते. रीव्हज् सारखा हंसत होता. शेवटी त्याला आवरेना. अगदी खाली बसून हंसत सुटला आणि "कोणाला बाद द्यायचे हे नाणे उडवून ठरवूया!" असे म्हणत नाणे उडवलेहि! (परंतु चेस्टर दुसऱ्या बाजूस असल्याने पूर्ण विचार करून योग्य त्या फलंदाजासच बाद ठरवण्यात आले.)

विनोदी पण प्रसंगास योग्य असे वागण्याचा आणखी एक मजेशीर प्रसंग रीव्हज् एकदा स्वतः गोलंदाजी करत होता. एकेकाळचा खेळाडू टॉमी ओटस् अंपायर होता. रीव्हज्चा चेंडू जेव्हा फलंदाजाच्या चेंडूला लागून यष्टिरक्षकाच्या हाती गेला—तेव्हा संवयीने ओटस् ओरडला—"हौज् दॅट्?" आणि रीव्हजने प्रसंग लक्षात घेऊन हात वर केला "औट!" आणि फलंदाजहि शांतपणे तंबूकडे निघून गेला!

पहिल्या महायुद्धानंतर हॅम्पशायरकडून खेळणारा जॉर्ज ब्राऊन हा विनोद करण्याबद्दल मशहूर होता. लॉर्डसच्या मैदानावर मिडल्सेक्स विरुद्ध खेळ चालू होता. संध्याकाळचे सहा वाजत आले होते आणि मिड्ल्सेक्सने दिवसभर भरपूर धांवा करून हॅम्पशायरच्या खेळाडूंना भरपूर दमवले होते. तेव्हा लॉर्ड टेनिसनने चेंडू टाकण्यासाठी हातात घेतला. त्यानी बारा पावलांचा स्टार्ट घेतला आणि वळून पाहतात तो सगळीकडे हंसू फुटलेले. विकेटकीपर ब्राऊन हा धांवत धांवत सीमारेषेपाशी जाऊन उभा राहिला होता. टेनिसनच्या चेहऱ्यावरचे भाव पाहण्याजोगे झाले होते. परंतु सर्वांना चेंडूमागे धावून आलेला शीण कमी झाला.

जॅक न्यूमन हाहि हॅम्पशायरचा खेळाडू. आणि असाच विनोदी. त्याला रेसचे वेड होते. घोड्यावर पैसे लावणे तसा सर्वच क्रिकेटशौकिनांचा छन्द आहे. परंतु काही त्यात विशेष रस घेणारे असतात. त्यापैकी न्यूमन हा एक त्याला खेळ सुरू व्हायच्या आधी एक आतली बातमी कळली होती की एक विशिष्ट घोडा नक्की जिंकणार आहे. त्याने ही बातमी खेळ सुरू होण्याआधी अंपायर चेस्टरला सांगितली. पुढे जेव्हा खेळ सुरू होऊन न्यूमन खेळायला आला त्यावेळी रेसचा निकाल लागला होता. आणि तोच घोडा जिंकला होता. खेळायला आल्याबरोबर न्यूमनने चेस्टरला 'तुझा घोडा जिंकला' असे सांगितले. पहिल्या चेंडूलाच चेस्टरने त्याला पायचीत बाद दिला.

"काय माणूस आहे! घोडा जिंकल्यामुळे चेस्टरला समोरचेहि दिसेनासे झाले!" असे त्याने सर्वांना सांगितले. मौज अशी की चेस्टरने घोड्यावर त्या दिवशी पैसे लावलेच नव्हते.

रेसची चेस्टरची दुसरीही अशीच मजेशीर आठवण आहे. जॉर्ज हंट नांवाच्या खेळाडूबरोबर त्याच्यासाठी निरोप पाठवला गेला होता.

हंटने खेळायला बॅट पुढे केली आणि विकेटकीपरच्या हातात (बॅटला कट् लागून) चेंडू गेला. व चेस्टरने त्याला 'बाद' ठरवले. तो जाताना इतकंच म्हणाला, "मी तुझा घोडा जिंकला हा निरोप सांगण्यासाठीच आलो होतो. अच्छा!"

कधी कधी फ्रँक चेस्टर देखील आपला निर्णय देताना प्रसंग पाहून भाषेत फरक करत असे. एकदा विल्फ्रेड ऱ्होड्स् खेळत होता. पायाचा अंगठा किंचित् पुढे येत असल्याचे लारवूडच्या लक्षात आले. त्याने एक चेंडू असा टाकला की पहिला टप्पा त्या अंगठ्यावर पडला. ऱ्होडसूला इतक्या वेदना झाल्या की त्याने घाईघाईने पॅड सोडले, बूट व पायमोजे, सर्व काढून तो अंगठा चोळू लागला. मधल्या काळात लारवूडने अपील केले होते व चेस्टरने त्याला बाद ठरवले होते. थोड्यावेळाने ऱ्होडस्ने पुनः पॅड बांधायला सुरवात केली. चेस्टर त्याच्याजवळ गेला. त्याच्या पाठीवर हात ठेवून म्हणाला, "डस्टी, तू चालू शकतोस का?"

"होय?"

"मग सावकाश तंबूकडे चालत जा!" मनावर अत्यंत ताण असलेल्या प्रसंगी काही विनोदी वाक्य टाकून त्याचा ताण नाहीसा करण्याची लकब काही खेळाडूंना साधते.

एका नवीन आलेल्या खेळाडूभोवती वेस्ट इंडीज संघातील सर्व खेळाडूंनी कडे केले. वॉरेलची टीम, खेळाडूने हंसत हंसत वॉरेलला म्हटले "ही माणसे जर आणखी जवळ आली तर 'अपुऱ्या प्रकाशा'-साठी मी अंपायरकडे तक्रार करू शकेन ना?" काळ्या रंगावरची ही चेष्टा आपले पांढरे शुभ्र दांत दाखवत हंसून वेस्टइंडिज संघाने सहन केली.

## तू आंधळा आहेस की काय ?

वेस्ट इंडीज संघातील खेळाडूहि स्वतःवरहि असे विनोद सहज










करू शकतात. एकदा वीक्स व दक्षिण आफ्रिकेचे दोन खेळाडू लंडनमध्ये टॅक्सीतून जात होते. द. आफ्रिकेच्या क्रिकेटच्या टीममध्ये काळ्यांना मज्जाव होता (आजहि आहे) त्यावेळी इंग्लंड विरुद्ध द. आफ्रिका हे सामने चालू होते. त्यामुळे तिघेही क्रिकेटविषयी उत्साहाने चर्चा करीत होते. ड्रायव्हरला राहवेना. त्याने विचारले, "तुम्ही तिघे द. आफ्रिका संघाकडून खेळता काय?" वीक्सने ताडकन् विचारले," का रे आंधळा आहेस काय तू?"

डेव्हिड शेपर्ड हा एकेकाळचा इंग्लंडचा उत्कृष्ट खेळाडू, तो धंद्याने धर्मगुरू होता. एकदा तो फलंदाजी करत असताना हॉलने त्याला विलक्षण वेगाने बंपर टाकला. तो चुकवायचा प्रयत्न करूनहि त्याच्या पृष्ठभागी लागला. पुढचा चेंडू टाकताना हॉलच्या गळ्यात असलेला क्रूस त्याच्या गळ्याच्या खोबणीत रूतला. थोडे रक्तहि आले. तावडतोब, "फादर, देवाला आपल्या भक्ताच्या पार्श्वभागी लागलेले बघवले नाही!" असा निष्कर्ष हॉलने शेपर्डला सांगितला. तेव्हा "ह्यापुढे सावध!" असेहि प्रत्युत्तरहि शेपर्डने दिले.

**देवाजीची खास प्रार्थना**

शेपर्डच्या धर्मगुरुपदाची नेहमी चेष्टा करण्यात येई. एकदा तो फलंदाजी करत असताना चार चेंडू स्टम्पस्च्या अगदी जवळून गेले. गोलंदाजाने विचारले, "आज देवाची खास प्रार्थना करून आलेला दिसतोस्?" "मी नेहमीच करतो, तू आज केलेली दिसत नाहीस!" शेपर्डने क्षणार्धात टोलवले.

सिड् पेगलर् नांवाचा द. आफ्रिकेचा खेळाडू होता. १९२४ साली गिलिगन् व टेट यांच्या गोलंदाजी वर संघ कोसळला त्यावेळी हा अकरावा गडी खेळायला गेला. तावडतोब बाद झाल्यावर तक्रारीच्या सुरात त्याने सांगितले, "अजून चेंडूवरची सोनेरी अक्षरे स्पष्ट वाचता येत होती. इतक्या नव्या चेंडूवर अकराव्या खेळाडूला पाठवल्यावर हेच होणार!"

**ती...तरी पकड नीट!**

झेल सोडणे वा झेलणे ह्यावर कसोटी सामन्यांचा विजय अवलंबून असतो हे आपल्याला तरी नवे नाही. तरी पण काही वेळेला चांगल्या खेळाडूंच्या हातूनहि सारखे झेल सुटत असतात. एकदा एका खेळाडूने कौंटी सामन्यात असेच झेल सोडले. थोड्या वेळाने आल्फ गोव्हरला (कॅप्टनला) त्याने सांगितले, "मी जरा लवकर जाईन म्हणतो मला आता गाडी पकडायची आहे!"

"गाडी पकडायची आहे? जा बाबा, ती पकडण्यात तरी यशस्वी हो!" हे गोव्हरचे उत्तर तो अजून विसरला नसेल.

ट्रुमन् हा द्रुतगति गोलंदाज सट्कवणारी उत्तरे देण्यात विलक्षण पटाईत.

एकदा तो मोटार वेगाने चालवत असताना पोलिसाने त्याला वेग मर्यादा ओलांडल्याबद्दल थांबवले. त्यांच्यामध्ये खालील प्रश्नोत्तरे झाली.

"तू फ्रेड ट्रुमन ना?" पोलिस.

"हो!"










" मोटार चालवण्याचा तुझा वेग तुझ्या चेंडूच्या वेगापेक्षा अधिक आहे."

"शक्य नाही, तसे असते तर तू मला पकडू शकला नसतास!"

ह्या उत्तराने पोलीस खूष झाला व त्याने ट्रमनला सोडून दिले.

ट्रमनचा आणखी एक किस्सा सांगण्याजोगा आहे. एकदा तो एका हॉटेलात उतरला होता. तिथे विलक्षण डांस चावत होते. त्याने हॉटेल मालकाला बोलावून सांगितले. मालकाने "दिवा मालवा म्हणजे डांस जातील" असा सल्ला दिला. थोड्या वेळाने काजवे आत आले.

हॉटेल मालकाने विचारले "काय डांस गेले का?" ट्रूमनने सांगितले "नाही. आता कंदिल घेऊन ते मला शोधताहेत!"

## होय, उलट्या दांडीने खेळेन!

फ्रेड टिटमस् हा इंग्लंडचा अष्टपैलू खेळाडू फार हजरजबाबी. एकदा तो खेळत असताना गोलंदाजाने सुनावले, "तू ज्याप्रमाणे खेळत आहेस, त्याप्रकारे तू उलटी बॅट धरूनहि खेळू शकशील!" कारण त्याच्या बॅटीची व चेंडूची गाठच पडत नव्हती. परंतु टिटमस् तितकाच खमक्या होता. त्याने ताडकन् उत्तर दिले "खरं आहे. तुझ्या चेंडू टाकण्याच्या पद्धतीकडे पाहता मी सहज उलट्या दांडीकडून खेळू शकेन."

अॅलेक् स्केल्डिंग हा एकेकाळचा खेळाडू व त्यानंतर अंपायर. तोहि एक विनोदी खेळाडू प्रसिद्ध होता. अंपायरच्या कर्तव्यावरती त्याने केलेली कविता मूळ इंग्रजीतूनच वाचली पाहिजे.

## पर्सी होम्सची सर्कस

एकदा ऑक्सफोर्डला यॉर्कशायरची टीम खेळायला गेली होती. हॉटेलमध्ये जागा नाही असे त्यांना सांगण्यात आले. चौकशी केल्यावर त्या बाईने सांगितले की सर्व जागा "जॅक हिल्टन आणि त्याचा बँड" ह्यांनी घेतल्या आहेत. पर्सी होम्स ह्या कॅप्टनने "आम्ही देखील त्याच धंद्यातली माणसे. पर्सी होम्स आणि त्याची सर्कस" असे सांगितले. ते सांगितल्यावर मात्र तावडतोब जागा दिली होम्सने सर्व टीमची यादी दिली होती. त्यांतील काही भाग असा:

निर्माता– हर्स्ट सर्वप्रमुख—होडर्स

रिंगमास्टर—ब्रायन सेलर्स

नृत्य शिक्षक—पर्सी होम्स

प्रमुख सोलो—सट्‌क्लिफ

•••




*पांचही पांडव व द्रौपदी अज्ञातवासाच्या शेवटच्या वर्षांत कीचकाचे दरबारी दाखल झाल्यानंतर सैरंध्रीला (द्रौपदी) पाहून संभ्रमित झालेला कीचक पुढे बलवास पाहून आणखीच घोटाळ्यात पडतो. (भाग ३) ती मग........!!*

अनु. प्रा. श्री. र. भिडे

४

[तीच रात्र. कीचकाचे सुसज्ज शयनमंदिर. सर्वत्र मुलायम गालिचे आंथरले असून मंचकावर गाद्या पसरल्या आहेत. खिडक्या आणि दरवाजे निळ्या नि तांबड्या पडद्यानी सुशोभित केले आहेत. कीचकाचा वेष साधाच असून तो मंचकावर रेलून वसला आहे. सैरंध्री मंदिराबाहेर जाण्याच्या तयारीत आहे.]

**कीचक:** येथून जाण्यापूर्वी मला मद्याचा आणखी एक चषक देणार काय?

**सैरंध्री:** जशी आपली आज्ञा महाराज......

**कीचक:** 'महाराज'–म्हणण्याची काहीच आवश्यकता नाही..... माझ्याशी बोलताना एवढ्या औपचारिकपणाची जरुरी नाही.. तू सम्राज्ञीची दासी असल्यानं तिच्याशी अशा प्रकारचं बोलणं ठीकच आहे. परंतु माझ्या बाबतीत नाही... माझं नृत्यालय हाच माझा दरबार... नि त्या कलागृहात साऱ्या स्त्रीपुरुषांचा–कलावंतांचा दर्जा एकच. (सैरंध्री थरथरणाऱ्या हाताने मद्याचा चषक देऊ लागते. पूर्वीप्रमाणंच तिच्याकडे न पाहता तो हात पुढे करून चषक हाती घेतो. परंतु सैरंध्रीच्या कंपायमान अवस्थेमुळं चषकातील थोडं मद्य गालिच्यावर सांडतं... तेव्हा कीचक तिच्याकडे पाहतो.... काही विचित्र भावना मनात उचंबळून येतात नि त्याचा डावा हात चटकन् आपोआप हृदयाकडे वळतो)... तू जेव्हा जेव्हा मला मद्य देतेस तेव्हा तेव्हा मला असंच होतं.. प्रत्येक वेळेला थोडं मद्य सांडतं... असं कां व्हावं? कदाचित् तूं मला भीत असावीस... वास्तविक तुला भिण्याचं काहीच कारण नाही. परंतु तू इथं नवी असल्यानं तुला कदाचित् हे माहितहि नसावं... स्वाभाविकच आहे. ताई, मला म्हणाली की तूं कोणीतरी वेषांतरीत राजकन्या आहेस म्हणे!....नि सांप्रत तुला वाईट दिवस प्राप्त झाले आहेत.. या कीचकाच्या राज्यात दुःखं धुक्यासारखी चटकन् नाहीशी होतात.... परंतु जेव्हा विलक्षण संकटं येतात तेव्हा त्याला प्रत्येकानं तोंड द्यायलाच हवं! पुराण कालातल्या आर्यावर्ताचा सम्राट–हस्तिनापूरचा राजा–सत्यव्रत हरिश्चंद्र नि त्याची राणी तारामती यांची कहाणी तुला ठाऊक असेलच.... तूं राजकन्या असल्यानं तुला ही कथा माहित असलीच पाहिजे.... तारामती एका ब्राह्मणाला विकली होती ती त्याच्या घरातील केवळ स्त्रियांची सेवा करण्याकरिता नव्हे–तर पुरुषांची सुद्धा.... हे लक्षात ठेवायला हवं! ही गोष्ट लहानपणी जेव्हा मला नि ताईला वडिलधाऱ्या माणसांकडून सांगण्यात आली त्याच वेळी आम्ही निश्चय केला कीं, आपल्या राज्याची द्वारं–श्रेष्ठ–कनिष्ठ असा भेदाभेद न करता सर्वांकरिता सदैव उघडी ठेवावयाची. इथं कुणीहि सहज यावं, रहावं, खावं–प्यावं, नाचावं–बागडावं, आमच्यासारख्या राजघराण्यातील व्यक्तींशी मनमोकळेपणानं बोलावं–चालावं–आणि आपली सारी दुःखं विसरून जावी.....तेव्हा तू ....तूंच काय पण द्रौपदीनं सुद्धा आपल्या पांच नवऱ्यांसह भ्रमंतीच्या काळात इथं येण्याचा शहाणपणा दाखविला असता... हं.....परंतु ते तिच्या नशिबीच नसावं.....पुन्हा माझ्या पूर्वस्मृति चाळवू लागल्या.....तूं, केवळ तुझ्या अस्तित्वानंहि – मला द्रौपदीची कितीदा आठवण करून देत आहेस याची तुला कशी जाणीव असणार! खरोखरंच सारं विचित्र आहे. तसं पाहिलं तर द्रुपदकन्येला पांच पति होते. अजूनहि ती तरुणच असावी... आणि तूं कुणाची तरी पत्नी होऊन आपल्या दुःखाचा शेवट करून घेण्यासाठी धडपडत असावीस.... बरेच दिवस लग्न न होणाऱ्या एखाद्या दासीप्रमाणे सेवा करिता करिता तुझ्या केसांना जो पांढुरका रंग आला आहे त्यामुळं थोडी प्रौढ दिसतेस.. इतकाच फरक... आपलं उर्वरित आयुष्य सुखात



अनुक्रमणिका






जावं म्हणून तूं एखाद्या पतीच्या शोधात............तशी तुला जरूरहि आहे.....काय मी म्हणतो ते खरं आहे ना?

**सैरंध्रीः** ना ही. . . . म हा रा. . . . ना ही!

**कीचकः** नीट सांग तुला काय सांगायचं आहे ते. . . . . . नवऱ्याची आवश्यकता नाही वाटत तुला?

**सैरंध्रीः** हो! . . . . म हा रा. . . . हो!

**कीचकः** तूं खरोखरंच विचार करून बोलते आहेस ना?

**सैरंध्रीः** हो. . . .

**कीचकः** (एकदम जोराने) पण कां? कदाचित् पूर्वी तुझं लग्न झालं असेल नि त्याविषयी काही बोलण्याची तुझी इच्छा नसावी. . . . . असंच ना?

**सैरंध्रीः** हो. . . . .

**कीचकः** कां नाही? . . . . का त्या नवऱ्याची लाज वाटते?

**सैरंध्रीः** (रागाने) नाही....

**कीचकः** मग बोलत कां नाहीस?

**सैरंध्रीः** काय?

**कीचकः** तुझा नवरा कोण होता, तुझं दुःखं काय आहे—ते सारं मला सांग. . . माणसानं माणसाला मदत करायला हवी.... कदाचित् माझी थोडी फार तुला मदत होईल. . . . . .

**सैरंध्रीः** या बाबत काही बोलायचं नाही अशी मी शपथ घेतली आहे. . . . . . .

**कीचकः** असं कां? तूं नि तुझा नवरा माणसंच आहात ना? हा कीचक तुमची दुःखं कमी करू शकेल...

**सैरंध्रीः** असं जर असेल तर मी सांगू इच्छिते. . . . . . . मी विवाहित आहे नि माझे 'नवरे.'

**कीचकः** काय म्हणालीस 'नवरे' ? कदाचित् चुकून म्हणाली असशील..... तुला एकाहून अधिक पति आहेत. . . . . . . .

**सैरंध्री** : हो... मी 'नवरे' असंच म्हटलं...

**कीचक** : (उत्सुकतेने) किती ?

**सैरंध्री** : पांच.

**कीचक** : काय पांच ? मी ऐकलं ते बरोबर आहे ?

**सैरंध्री** : होय.

**कीचक** : (मोठ्याने हंसत) तूं स्वतःला काय 'द्रौपदी' समजतेस ! मला इतके दिवस वाटत होतं की 'द्रौपदी' एकच आहे, पण आता दोन दिसताहेत... काय विचित्र घटना आहे... कुठं असतात हे तुझे पांच पति...? द्रौपदीच्या पांच नवऱ्यांप्रमाणं तुझेहि पति मानवच आहेत ना ?

**सैरंध्री** : (अभिमानाने) देवकुलोत्पन्न असल्यानं तेहि देवच आहेत..

**कीचक** : मानवी स्त्रीचं देवांशी लग्न झालेलं कधी कुणी ऐकलंय ?

**सैरंध्री** : हो.. नसेल पण मी मात्र केलं आहे... जन्माला आलेली प्रत्येकच स्त्री देवाशी विवाहबद्ध होत असते...

**कीचक** : अशा अर्थानं म्हणतेस होय ? तूं मला वेदान्त शिकवशील असं वाटलं नाही मला...जन्माला आलेली प्रत्येक स्त्री—पांच पतींशी—पंचमहाभूतांशी विवाहबद्ध होत असते हे खरं आहे, पण ते पति मानवी देह धारण करणारे नसल्यानं तिच्या संरक्षणासाठी सहाव्या रक्तामांसाच्या पुरुषाशी लग्न करणं तिला भाग असतं...

**सैरंध्री** : मला नाही तसं वाटत... माझे पांचहि पति देव असून माझं सर्व प्रकारे रक्षण करण्यास ते समर्थ आहेत... नि म्हणूनच माझ्या बाबतीत तरी सहाव्याची काही आवश्यकता नाही...

**कीचक** : तुला सांप्रत वाईट दिवस आल्यानं आता ते तुझं संरक्षण कसं करणार ? सध्या तरी तुला सुख देणारा—बाहुपाशात कवटाळणारा—कोणीच दिसत नाही...कीचकाच्या या पुण्यभूमीत तूं सर्व संकटापासून मुक्त राहशील हे खरं, पण एकदा का तुझं पाऊल या राज्यावाहेर पडलं म्हणजे कोणीहि तुझ्याकडे वाकडी नजर टाकेल.. त्यातून तूं अशी अत्यंत नाजुक आणि अशक्त... माझ्या हातात मद्याचा चषक देतानाच तुझा अशक्तपणा सहजच माझ्या लक्षात आला... कीचकाची स्त्रियांशी वागणूक किती अदबीची नि सभ्यतेची आहे हे साऱ्या राज्याला ठाऊक असता, माझी सेवा करताना तं थ्यावंस याचं मोठं आश्चर्य वाटतं... अंतःपुराच्या बाहेर वावरताना तुला मोकळेपणा नि निर्भयता कशी वाटणार ? शिकाऱ्याच्या खोपटात एखाद्या काळवीटानं - हरिणीनं - स्वखुशीनं शिरावं तशी तुझी अवस्था होईल... पांच वीर पुरुष पति म्हणून असताना, सुयोधन आणि त्याच्या हस्तकांनी केलेल्या विटंबनेपासून—तेहि पांची पति प्रत्यक्ष तेथे असताना द्रौपदीला सुद्धा आपली सुटका करून घेता आली नाही—असं बोललेलं मी आजपर्यंत कितीदा तरी ऐकलं आहे... मी जर त्यावेळी तिथं असतो, तर त्या दुरात्म्यांनी तिच्यावर पापी नजर नि हात टाकण्याच्या आतच माझ्या ह्या समर्थ बाहूंनी त्यांचे डोळेच फोडले असते... नि त्यांची ओळख सुद्धा पटू नये अशा रीतीनं त्यांची टाळकी चेचून त्यांना विद्रूप केलं असतं... पण जाऊ दे ते... तूं काही द्रौपदी नाहीस... नि तुझे पांचही पति मानव नाहीत... आणि म्हणूनच तुला कोणा तरी मानवी पतीची—पाहिजे तर माझ्यासारख्या पुरुषाची म्हण—आवश्यकता आहेच. मी काही तुला मागणी घालतो आहे अशातला भाग नाही—पण राजकुलोत्पन्न कीचकाने तुझ्यासारखीला मागणी घातली तर तो खरोखर तुझा बहुमानच होईल... माझ्यासारख्याला नाकारण्याचे तुलाहि काहीच कारण नाही—हे दाखवण्यासाठीच जर समजा तुला मागणी घातली तर !... तुला काय वाटतं ?

**सैरंध्री** : माझे पांचही पतिदेव खरोखरच बलशाली आहेत नि सर्व प्रकारच्या संकटांपासून माझं ते संरक्षण करू शकतील याबाबत मला तिळमात्र संदेह नाही...

**कीचक** : परंतु ते देव आहेत.. मानव नाहीत.. मी जेव्हा तुझ्या पाणिग्रहणासाठी हात पुढं करतो - अर्थात् असं जर मी खरोखरच केलं तर - ते केवळ संकटापासून तुझं संरक्षण व्हावं एवढ्याच हेतूनं नव्हे, तर तूं सुखी, समाधानी व्हावी असं मला मनापासून वाटतं.. असं म्हणतात की मानवी स्त्रीचं संरक्षण करण्यासाठी प्रत्यक्ष देवच पुरुषरूपानं या पृथ्वीवर अवतरत असतो. आणि ही स्त्री आणि हा






पुरुष अन्य स्त्रियांच्या संरक्षणासाठीच इतर देवांना मानवी रूप देण्यास सहाय्य करीत असतात... नि यामुळंच जगाचं रहाटगाडं चालूं राहतं...

**सैरंध्री** : ते काहीहि असलं तरी मी सुरक्षित आणि सुखी असल्यानं..

**कीचक** : अशी एकटीच एकाकी राहून ? तूं सुरक्षित आहेस असं कां तुला म्हणायचं आहे ?

**सैरंध्री** : मी एकटी नाहीच.. पांच पतिदेवांच्या सान्निध्यात असल्यानं......

**कीचक** : या तुझ्या अर्धवट बोलण्यानं माझी उत्कंठा वाढत आहे! हे पहा तूं म्हणतेस की तूं एकटी नसून पांच देवांशी लग्न केलं आहेस. पारमार्थिक दृष्टया तुझं म्हणणं खरंहि असलं तरी वास्तविक अर्थानं तूं एकटीच आहेस. . आणि म्हणूनच मला वाटतं एका मानवी पतीला तूं वरावं ! ... पण अशा वितंडवादानं आपलं एकमत व्हायचं नाही... तेव्हा मला वाटतं माझ्या मेव्हण्यांच्या – सम्राट विराट महाराजांच्या दरबारात कोणी एक नवे सल्लागार आले आहेत म्हणे– नि पहिल्या पांडवाप्रमाणं–ते–धर्मराजाप्रमाणं कनवाळू नि निःपक्षपाती आहेत असं ताईचं मत आहे. हा प्रश्न आपण उद्या त्यांच्यापुढं दरबारात मांडू या... आणि ते जो निर्णय देतील तो शिरसावंद्य मानू या... काय आहे कबूल...

**सैरंध्री** : (निश्चयात्मक) नाही ! नाही !!

**कीचक** : (आर्जवाने) हे तुझं म्हणणं काही खरं नाही... माझं म्हणणं वाजवी नसून तुझंच म्हणणं योग्य आहे हे पडताळून पाहण्यास तूं मला संधि दिली पाहिजेस...

**सैरंध्री** : हा काही वादाचा विषय नव्हे !

**कीचक** : कबूल ! नसेल... परंतु योग्य तो निर्णय देण्यासारखा तरी विषय आहे का नाही ?

**सैरंध्री** : (शब्दात सांपडते. परंतु या अडचणीतून कंकभट सहज सोडवेल अशी खात्री असल्याने थोडा विचार करून) हो.. होय.. आहे खरा...

**कीचक** : ठीक ! तूं खरोखरच विचारी स्त्री आहेस, हे पाहून मला आनंद वाटतो. आणि म्हणूनच तूं उच्च कुलोत्पन्नहि असावीस असा विश्वास वाटतो.

**सैरंध्री** : (साशंकतेने) काय ?

**कीचक** : त्या महानुभावानं उद्या तूं बरोबर आहेस असा जर निर्णय दिला तर इतःपर मी तुला याविषयावर बोलून बिलकूल त्रास देणार नाही... परंतु जर माझंच म्हणणं योग्य आहे असा त्याचा अभिप्राय पडला तर मात्र या नगरातलाच कोणा तरी उच्चपदस्थ पुरुषाची निवड करून त्याच्याशी तुझं लग्न लावून देण्याची नि माझ्यासारख्या अज्ञात पुरुषाची, सम्राज्ञीची दासी या नात्यानं सेवा करण्याच्या कामगिरीतून तुझी कायमची मुक्तता करण्याचा मी जातीनं प्रयत्न करेन ! .. असं केल्यानं आणखीहि एक गोष्ट साध्य होणार आहे.. आमची ताई माझी सेवा करण्याच्या मिषानं माझ्याभोवती... जो तरुणींचा घोळका उभा करते त्यातून माझीहि मुक्तता होईल. काय आहे कबूल ?

**सैरंध्री** : (तेथून निसटण्यास उत्सुक असल्याने) बरं !

**कीचक** : ठीक आहे... जा तूं आता... आपली भेट आता उद्या दरबारात सल्लागारांचा निर्णय ऐकतानाच होईल...(दुसऱ्या दिवशी आणखी दुसऱ्या दिव्यातून पार पडायचे आहे या जाणीवेने सैरंध्री जाते. कीचक सावकाश मदिरापान करतो नि पडदा पडतो–)

* *

[ दुसरा दिवस. दुपारची वेळ. सम्राट विराट महाराजांचा दरबार. आपापल्या मानानुसार स्त्रीपुरुष योग्य त्या जागी स्थानापन्न झाले आहेत. सिंहासनाच्या उजव्या बाजूच्या एका उच्चासनावर बसून कंकभट न्यायदानाचे आणि सम्राटांना सल्ला देण्याचे काम करीत आहे. रंगमंचाच्या डाव्या कोपऱ्यात आपले पाय एकमेकापासून दूर ठेवत, डावा हात कमरेवर नि उजव्या हाताने रंगमंचाच्या उजव्या कोपऱ्यात उभ्या असलेल्या सैरंध्रीकडे अंगुलीनिर्देश करीत कीचक उभा आहे. दरबारातील मंडळी 'काय न्याय आहे ! वाहवा ! धन्य' अशा शब्दात कंकभटाची स्तुति करतात. ]

**कीचक** : (आनंदातिशयाने) आता आलं लक्षात! न्यायाधीश महाराज, आमचं काय बोलणं झालं ते मी सांगू इच्छितो. आपण थेट थोरल्या पांडवाप्रमाणं–साक्षात् धर्मराजाप्रमाणं आहात... आमच्यात असं ठरलं होतं की जर आपण आपला निर्णय माझ्या बाजूनं दिला तर मला योग्य वाटेल त्या पुरुषाची निवड करून मी तिचा विवाह त्याच्याशी लावून द्यावयाचा आणि तिला जन्माची सुखी करावयाची..

**सम्राट** : सम्राज्ञींच्या दासीची यास मान्यता होती काय ?

**सैरंध्री** : (अश्रुपूर्ण नेत्राने) नाही... नाही... पण... हो... हो.. नाही.. हो... नाही...

[ सम्राट कंकभटाकडे संशयाने पाहतो. न्यायमूर्ति कंकभट मान

---

**एक महान् देश आणि त्याची तितकीच महान् (मूर्ख) जनता**




**समाजकल्याण !**





सर्व बळ एकवटून...एकीने...जिद्दीने खेचून घेऊ.
परिश्रमांची पराकाष्ठा करून...प्रयत्नांचे समाधान व यशाचा निर्भेळ आनंद पदरी पाडून खेचत रहाण्याचे तंत्र आम्हाला सुरुवातीपासून साध्य झाले आहे.
'स्वस्तिक'ला रबर धंद्यातील अग्रस्थान प्राप्त होण्यापूर्वी—
एका छोटया शेडमध्ये धंद्याची अल्पांशाने सुरुवात ...२५ वर्षांचा प्रदीर्घ अनुभव...तज्ञांचा सखोल अभ्यास...मालाची विक्रीपूर्व चाचणी...आणि याहीपेक्षा अधिक म्हणजे मनातील जिद्द.
सहाजीकच आमच्या रबरी उत्पादनाचा दर्जा सर्वोत्कृष्ट आणि अजोड असणारच.
'स्वस्तिक'ची कांही रबरी उत्पादने—
होज पाइप्स, रबरी बुचे, ऑटो पार्टस्, ऑईल सील्स्, ॲडीझीव्हज्, हवामानविषयक बलून्स्, लॅटेक्स उत्पादने-उदा. हातमोजे (शस्त्रक्रीयेसाठीं, औद्योगिक व घरकामासाठी), रबर गमबूटस् आणि कॅन्व्हॅस बूट्स् व इतर विविध पादत्राणे.
स्वस्तिक
स्वस्तिक रबर प्रॉडक्ट्स लिमिटेड, खडकी, पुणे-३.
TOM & BAY SR/6605-M




मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास





अनुक्रमणिका

ढोलावून कीचकास पुढे बोलण्यास खुणावतो, इतक्यात सैरंध्री ओरडून सांगते ]– पण, ज्ञानराज, आता मला पति नको आहे... माझ्यावर हा जुलूम कां ?

**कीचक** : हा प्रश्न तूं न्यायमूर्तींनाच विचारतेस? त्यांची जर अनुमति असेल तर मी तोंडातून ब्र सुद्धा काढणार नाही नि तुला तुझ्या पतिदेवांच्या स्वाधीन करून मोकळा होईन.

**सैरंध्री** : (गुडघे टेकीत) हा काही खरा न्याय नाही.. महाराज, मी आपणापासून मानवी दयेची अपेक्षा करीत आहे... न्यायमूर्ति महाराज, माझ्यावर माणुसकीची कृपा दाखवून – नकार द्या...

**कंकभट** : (गंभीरपणे) तूं म्हणतेस की तूं एक मानवी स्त्री आहेस... आणि हे जर खरं असेल तर तूं माणसाप्रमाणंच वागलं पाहिजे. जे बोलायचं ते खरं बोल... नि जसं बोलशील तसंच वाग... तूंच हे सारं कबूल केलंस ना ! तूं माणूस असल्यानं दिलेला शब्द तुला आता मोडता येणार नाही....

[ पुन्हा एकदा दरबारातील मंडळी न्यायमूर्तींच्या बोलण्याची प्रशंसा करतात. सैरंध्री आपला चेहरा दोन्ही हातांनी झाकते ]

**कीचक** : न्यायासनाला माझा साष्टांग प्रणिपात असो ! महाराज, आपणास साक्षी ठेवून मी अशी प्रतिज्ञा करतो की उद्या सूर्य अस्ताला जाण्यापूर्वी या दासीच्या कल्याणासाठी तिला योग्य अशा पतीची निवड मी करेन.

**सैरंध्री** : (हातातून चेहरा बाहेर काढून दटावणीच्या आविर्भावानं कीचकाला उद्देशून) तूं जर आता बोलल्याप्रमाणं करू पाहशील तर त्याचं प्रायश्चित् तुला भोगायची वेळ येईल... प्रसंगी जीवही गमावण्याची वेळ येईल–हे पक्के लक्षात ठेव....

**कीचक** : (मोठमोठ्याने हंसत) या अजिक्य कीचकाला तूं आव्हान देतेस ! ठीक आहे प्राण गमावण्याचा धोका पत्करूनहि मी त्याचा स्वीकार करीत आहे... मूर्तिमंत धर्मराजाप्रमाणं न्यायासनाला शोभायमान होणाऱ्या या नव्या न्यायमूर्तींच्या नियुक्तीस्तव मी सम्राट आणि सम्राज्ञी यांना धन्यवाद देऊ इच्छितो. (न्यायासनास वंदन करून जातो.)

**सैरंध्री** : (जवळ जवळ किंचाळत) मी म्हणजे मूर्तिमंत दुःख... (मूर्च्छा येऊन पडते.)

**सुदेष्णा** : (सैरंध्रीच्या जवळ जात) अरेरे ! खरोखरच दुर्दैवी बिचारी... एकदा का तुझा कीचकाशी... तुझी सारी दुःखं संपुष्टात येतील... (तिला कुरवाळत) कां उगाच त्रास करून घेतेस... रडू नकोस ! (पडदा पडतो)

**

[कीचकाच्या महालाकडून पाकशाळेकडे जाणाऱ्या मार्गावरील पवित्र प्रणयकुंज.. कारंजाच्या जवळच असलेल्या लतागृहाचे खांब दगडी असून चांदण्यात त्याची शोभा फारच खुलून दिसत आहे. जाईच्या वेलींनी खांबाना वेष्टिले असून त्यावर लाकडी दांडक्याने प्रहार केले असता विविध प्रकारचे संगीतमय सूर ऐकू येतात. कारंजावरील घंटांचे नाद या स्वरांशी जुळणारे आहेत. कीचक आपल्या मंदिराच्या सज्जात उभा राहून कौमुदीने न्हाहून निघत असलेल्या प्रणयकुंजाचे सौंदर्य पहाण्यात मग्न असता सम्राज्ञीच्या मंदिराकडून सैरंध्री कीचकाच्या मंदिरात नित्याप्रमाणे प्रवेश करते व तो तेथे नाही असे पाहून त्याची शय्या तयार करते. पिण्याचे पाणी, दुधाचा प्याला नि सुरापात्र व चषक पलंगावर पडल्या पडल्या सहज घेता यावा अशा रीतीने जवळच ठेवते, नि बहुतेक सर्व काम झाले असल्याने आली तशीच सावकाश परत जाऊ लागते.... परंतु सम्राज्ञींच्या मंदिराकडे न जाता तिथंच ती क्षणभर रेंगाळते नि बल्लवाला भेटण्यासाठी संकेतस्थान असलेल्या प्रणयकुंजाच्या दिशेने तिची पावले आपोआप वळतात. कीचक आपल्या मंदिराच्या सज्जातून हे सारे लक्षपूर्वक पहात आहे. तो थोडा थांबतो, कपाळाला आठ्या घालतो नि स्वतःशीच पुटपुटतो–]

**कीचक** : राजघराण्यातील नवदंपतीचं हे पवित्रस्थान !.. नि ही तिकडे कां जात आहे ? ही सुद्धा राजघराण्यातील रक्ताचीच आहे हे ताईनं सांगितलेलं विसरलोच मी ! कदाचित् ती तिथं आपल्या पति देवांची वाट पहात असावी... ताई म्हणते त्याप्रमाणं देवांच्या पदस्पर्शानं या स्थळाचं पावित्र्य अधिकच वृद्धिंगत होतं आहे... ताईचा हेतु सफळ होणार असं मला वाटू लागलं आहे कारण मी या दासीकडे जो जो सूक्ष्मपणे पाहू लागतो तो तो मला द्रौपदीची आठवण तीव्रतेने होऊ लागते. हिच्या सान्निध्यात माझं हृदय आनंदानं नाचू लागतं. (स्वतःशीच विचार करीत सज्जात तो फेऱ्या घालू लागतो.) हिला योग्य असा राजघराण्यातील पुरुष पति म्हणून निवडून त्याच्याशी लग्न लावून देईन असं मी दरबारात म्हणालो खरं ! नि कीचक बोलल्याप्रमाणं वागत आला आहे ! मुलींसाठी स्थळं पाहण्याचं काम मी आजपर्यंत कधीच केलेलं नाही... माझ्या बहिणीसाठी सुद्धा– सम्राट विराट महाराजांना शोधायला मी गेलो नाही... नि आता ? मी स्वतःहूनच स्वतःवर केवढं साकडं घालून घेतलं आहे... (सैरंध्रीकडे पहात) हिच्या प्रार्थनांमुळं हिच्यासाठी अनुरूप वर शोधून काढण्यात मला यश प्राप्त होवो ! (चालता चालता सज्जात वृक्षाची जी छाया पडली आहे तीत येऊन सैरंध्रीकडे पहात असता).. परंतु हा योग्य पुरुष कोण ?... तसाच जर विचार करायचा झाला तर मी स्वतःचीच निवड करून हिचा जर पत्नी म्हणून स्वीकार केला तर काय हरकत आहे ? ताईलाच काय साऱ्या प्रजाजनांना सुद्धा विलक्षण आनंद होईल... हा विचार ठीक आहे... प्रजेचीहि इच्छा अशीच असणार... मी आत्ताच सैरंध्रीकडे जाऊ ? माझ्या दृष्टीनं तर ही वेळ फारच नामी आहे... कारण ज्या पवित्र प्रणयकुंजात आमच्या घराण्यातील नवदंपतीनी पहिल्या प्रीतीच्या शपथा घेतल्या त्या स्थानीच सध्या ती आहे... नि ती आपल्या पति देवांशी तिथंच बोलणार... मला वाटतं त्यांनीच तर ही प्रेरणा माझ्या मनात उत्पन्न केली नसेल ना ! कदाचित् तिची प्रार्थना ऐकून, प्रसन्न होऊन तेच मला तिच्याकडे धाडत असतील... तिथं तिच्या पांच दैवी पतींच्या बरोबर मी सहावा मानवी पति...










ठीक आहे... मला आता तिथं जायलाच हवं... (वृक्षाच्या छायेतून कीचक बाजूला येतो तेव्हा ढगाआड लपलेला चंद्रही स्पष्ट दिसू लागतो. कीचक सज्जात उभा राहून आपल्याकडे पहात आहे ही जाणीव नसल्याने आणि रात्रीच्या या वेळी येथे आता कोणीहि येण्याची शक्यता नाही अशी खात्री असल्याने सैरंध्री लतागृहात प्रवेशते. लाकडी दांडके एका दगडी खांबावर आपटते. त्यातून निघणारे सूर कारंज्यावरील घंटांच्या नादात मिसळतात. एका विवक्षित पक्ष्याच्या ओरडण्याच्या आवाजाने प्रियकराला—बल्लवाला—संकेतस्थानी येण्याची सूचना दिली जाते.)— मी हिच्याकडे जावं असं मनात योजतो न योजतो तोच तिनंच येण्याची ही संज्ञा दिलेली दिसते ! आश्चर्य आहे ! खचित् ही देवांचीच इच्छा असली पाहिजे... मला आता घाई करायला हवी. (तो चांदण्याच्या दिशेने जाऊ लागतो न लागतो तोच पाकशाळेकडून येणाऱ्या जड पावलांचा आवाज ऐकू येतो. ऐकलेला आवाज बरोबर आहे ना याचा अंदाज घेतो नि स्वतःशीच पुटपुटतो.) ... या मानवी स्त्रीच्या विनंतीला मान देऊन देव खरोखरच इथं येत असतील का ? नि हे जर खरं असेल तर त्या दैवी व्यक्तींना आवाहन करणारी ही स्त्री सुद्धा देवताच असली पाहिजे... मग माझी निवड काही अयोग्य खासच नाही... खरोखरच मी स्वतः होऊन हात पुढे करून हिला सुखी केलं पाहिजे... मी याच क्षणी... (तो स्वतःशीच असे बोलत असता उजव्या हातात काहीतरी वस्तु घेऊन पाकशाळेतून येणारी एक मानवी आकृति त्याला दिसते... सूक्ष्म निरीक्षणांती ती व्यक्ति त्याला पूर्वी पाहिल्यासारखी वाटते. तो झटकन् वृक्षाच्या छायेत जातो.. काही क्षणानंतर)... हा काही देव खास नाही... हा मानव आहे नि तोहि परिचित वाटतो... हा कोण असावा ? हा राजकुलोत्पन्न खास नाही ! नि यानं यावेळी पाकशाळेतनं कां यावं ? राजगृहातील कोणी नोकर तर नाही ना ! हिनं बोलवल्याबरोबर त्यानं कां यावं ? कां हे या स्त्रीचं सोंग—ढोंग आहे ! ... कदाचित् असेलहि... नाही... असंच असलं पाहिजे... या स्थानाचं पावित्र्य ही भ्रष्ट करू पहात आहे... याचा बंदोबस्त ताबडतोब झाला पाहिजे... (असे म्हणून सज्जातून उडी मारून तो प्रणयकुंजाजवळ येतो नि चार पांच टांगा टाकून तो सैरंध्री नि बल्लव यांच्या पुढे येऊन ठाकतो. त्याच वेळी बल्लव आपल्या हातातील वस्तू दगडी खांबावर आदळण्याच्या विचारात असता नि त्यातून परिचित सूर निघतील ही अपेक्षा करीत असतानाच कीचक त्याच्या हातातील वस्तूला तो दगडीखांबावर आदळण्यापूर्वीच हिसका देऊन खाली पाडतो नि वस्तु कारंजाच्या पाण्यात भिरकावून देतो, पाण्यावर ती आदळण्यापूर्वी एका दगडी खांबाला चाटून जाते नि त्यातून असे काही स्वर निघतात कीं जे राजघराण्याव्यतिरिक्त असलेल्या स्त्रीपुरुषांनी ऐकू नये अशी कीचकाची इच्छा असते. तो विलक्षण रागावला आहे...) नीच माणसा ! या पवित्र स्थानी पाऊल टाकताना तुला शरम वाटली नाही... तुझ्यासारख्या क्षुद्राच्या पावलांनी हे पवित्र स्थान विटाळू पहातोस ! ... थांब तुला दाखवतोच... (थोडा विचार करून)... परंतु कदाचित् तुला या स्थानाचं महात्म्य माहीत नसावं... तू कदाचित् इथं नुकताच आला असशील... (कीचकाच्या



# चौकारांची आतषबाजी

क्रिकेटचा सामना पहायला आलेल्या प्रेक्षकाला मंदगतीचा खेळ नको असतो. त्याला हवा असतो धडाकेबाज खेळ. चौकारांवर-चौकार. म्हणूनच फलंदाजाने मारलेल्या प्रत्येक चौकाराचं तो टाळ्या वाजवून स्वागत करीत असतो.

ही चौकारांची आतषबाजी पहा—

एकाच डावात जास्तीत जास्त चौकार पी. ए. पेरीन ह्या खेळाडूने मारून विक्रम केला आहे. १९०४ साली इसेक्स् वि. डर्बीशायर ह्या चेस्टरफील्ड येथे झालेल्या सामन्यात इसेक्स् संघातून खेळताना पेरीनने ३४३ (नाबाद) धावा केल्या. त्यात ६८ चौकार होते.

जून १९३६ रोजी बाथ येथे नॉर्दम्प्टनशायरविरुद्ध खेळताना सॉमरसेटच्या एच्. गिम्ब्लेटने लागोपाठ १८ चौकार मारले. त्यात सहा षट्कार व बारा चौकार होते. गिम्ब्लेट १४३ धावा काढून बाद झाला.

एकाच डावात जास्तीत जास्त षट्कार मारण्याचा पराक्रम सी. के. नायडूनी केला आहे. १९२६–२७ साली मुंबई येथे हिंदू संघातून एम्. सी. सी. विरुद्ध खेळताना सी. के. नी अकरा षट्कार मारले. सी. के. नी त्यावेळी १५३ धावा काढल्या होत्या. त्यानंतर एवढे षट्कार श्री. सी. जे. बार्नेट व रिची बेनॉ ह्यांनी मारले आहेत. बाथ येथे १९३४ साली ग्लाऊसेस्टर संघातून सॉमरसेट विरुद्ध खेळताना बार्नेटने आपल्या १९४ धावात ११ षट्कार मारले होते, तर बेनॉने सप्टेंबर १९६१ साली टी. एन्. पीअर्सच्या संघाविरुद्ध स्कारबरो येथे खेळताना आपल्या १३५ धावात ११ षट्कार मारले होते.

न्यू साऊथ वेल्सचा प्रसिद्ध फलंदाज व्ही. टी. ट्रम्पर हा १९०२-०३ साली ऑस्ट्रेलियात एका क्लबच्या सामन्यात खेळला होता. तेव्हा त्याने स्वतःच्या ३३५ धावात २२ पंचकार (हल्ली षट्कार) लगावले होते.

कसोटी सामन्यात चौकाराचा चमत्कार ब्रॅडमनने केला आहे. जुलै १९३० रोजी लीड्स् येथील कसोटी सामन्यात ब्रॅडमनने ३३४ धावा काढल्या होत्या. त्यात ४६ निव्वळ चौकार होते.

चार वर्षांनंतर त्याच क्रीडांगणावर आणखी एका कसोटी






सामन्यातून खेळताना ब्रॅडमनने ३०४ धावा केल्या. ज्यामध्ये ४३ चौकार आणि २ षट्कार होते.

इंग्लंडचा हॅमंड हा असाच एक तालेवार फलंदाज. १९३३ च्या एप्रिलमध्ये ऑक्लंड येथे न्यूझीलंड विरुद्ध खेळताना त्याने ३३६ (नाबाद) धावा काढल्या. ह्यातील १९२ धावा तर त्याने निव्वळ सीमेपार फटके मारून मिळवल्या होत्या—३३ चौकार आणि १० षट्कार. हॅमंड ५। तास खेळत होता.

चौकारांचा बादशहा म्हणून ज्याचा यथार्थाने गौरव करता येईल असा खेळाडू एकच आहे आणि तो म्हणजे सॉमरसेटचा ए. डब्ल्यू. वेलार्ड हा होय ! १९३५ साली वेलार्डने ७२ षट्कार मारले होते. त्या हंगामात त्याने काढलेल्या नेत्रदीपक धावा अशा— नॉटिंगहॅम येथे नॉटिंगहॅमशायरविरुद्ध खेळताना ६८ धावा (४ षट्कार आणि ७ चौकार), ५७ धावा (५ षट्कार) आणि ८३ धावा (ह्यातील ५७ धावा केवळ बारा फटक्यात जमविलेल्या— ४ षट्कार, १ पंचकार, व ७ चौकार) क्लॅक्टन येथे इसेक्स्-विरुद्ध खेळताना ७४ धावा (४ षट्कार आणि ८ चौकार) आणि ७० धावा (६ षट्कार आणि ५ चौकार) कॅंट विरुद्ध खेळताना काढल्या.

क्रिकेटच्या इतिहासात वेलार्डएवढे षट्कार कोणीही मारलेले नाहीत. त्याने एकूण किती षट्कार मारले हे निश्चितपणे सांगता येत नाही. पण १९२७ ते १९५० पर्यंतच्या आपल्या क्रिकेटच्या कारकीर्दीत त्याने पांचशेच्या वर षट्कार मारले आहेत. हा आंकडा अजब आहे. परंतु, १९३५ व १९३६ ह्या केवळ दोन हंगामातच त्याने निव्वळ १२९ षट्कार मारलेत. हे पाहिल्यावर उरलेले षट्कार मारण्यासाठी त्याला खूप अवधी होता हे विसरून चालणार नाही.

**—फलंदाज**

---

अनपेक्षित आगमनाने सैरंध्री आणि बल्लव स्तंभित झाले असता पुन्हा तो विचारतो)... तुला हे माहीत नसावं हेच खरं... हे विचित्र स्वर ऐकून बहुधा तूं बाहेर आला असावास... होय ना ! सैरंध्री बोल...

**सैरंध्री :** (क्षुब्ध परंतु कंपितकाया) ना... नाही...

**कीचक :** नाही... काय नाही ? काय म्हणालीस...

**सैरंध्री :** (पर्वा न करता) मी 'नाही' म्हटलं... नि पुन्हा तेच म्हणत आहे...

**कीचक :** तूं बोलावलं म्हणून हा आला असंच ना तुला म्हणायचं आहे.....

**सैरंध्री :** होय !

**कीचक :** (रागाने) हा... एक गांवढळ माणूस...राजवाड्यातला एक क्षुद्र नोकर... तुझ्यासारख्या वेषांतरीत राजकन्येने प्रीतीची संज्ञा दिली म्हणून हा आला...

**बल्लव :** तुमचा काहीतरी गैरसमज होतो आहे... मी या पाकशाळेतील राज-सूपकार असल्याने माझ्या क्षेत्रात मी राजाच आहे...

**कीचक :** म्हणून काही तूं आमच्या राजकुलातला नव्हेस, इतकंच काय पण आमचा दूरचा सुद्धा आप्तेष्ट नाहीस... ही जागा अत्यंत पवित्र आहे... जो आमच्या कुळात जन्मलेला नाही किंवा जो आमचा गोत्रज नव्हे त्याला या भूमीला शिवण्याचाहि अधिकार नाही... ताई, सांगत होती की तिनं आजपर्यंत या जागेचं पावित्र्य अबाधित राखलं आहे... (सैरंध्रीकडे वळून) आपल्या दैवी पतींची इथं भेट घेण्यासाठी तूं तिची अनुमति घेतली होतीस म्हणे— होय ना ?

**सैरंध्री :** होय... माझे दैवी पति माझ्या बोलावण्यानुसार इथं येतात हे खरं आहे...

**कीचक :** मग हा मानव... क्षुद्र... तुझ्या बोलण्यानुसार इथं कसा आला ? हा प्रकार किती दिवस चालला आहे ?

**सैरंध्री :** मी इथं आल्यापासनं...

**कीचक :** तुम्ही दोघंहि इथं एकदमच आलात ?

**सैरंध्री :** होय !

**कीचक :** म्हणजे हा तुझा प्रियकर ? (सैरंध्री उत्तर देत नाही. कीचक रागाने) बोल, हा तुझा कोण ? प्रियकर ? पति ?

**सैरंध्री :** दोन्हीहि... पति नि खरा प्रियकर..

**कीचक :** (क्रोधाने लाल होत) खोटारडे ! हा तुझा प्रियकर कसा असेल ? (वल्लभ त्याचं बोलणं लक्षपूर्वक ऐकत आहे) तूं सांगत होतीस की तुझे पति पांच असून ते देव आहेत... मी पसंत करीन त्या राजकुलोत्पन्न पुरुषाबरोबर विवाहबद्ध होण्याचं भर दरबारात तूं आजच कबूल केलं आहेस, नि मीहि उद्या सूर्यास्ता-पूर्वी तसं घडवून आणण्याची प्रतिज्ञा केली आहे... त्या श्रेष्ठ न्याय-मूर्तींना दिलेल्या शब्दातून स्वतःची सुटका करून घेण्यासाठी तर तूं हे नाटक करीत नाहीस ना ! पण लक्षात ठेव... हा अजिंक्य कीचक असल्या सोंगाढोंगानं फसायचा नाही... चालती हो येथून... ढोंगी...

**बल्लव :** ती तशी नाही... नि मला असं वाटतं... माझा...

**कीचक :** तुझा काय ? (बल्लव दांत ओठ खात कारंजाकडे पहात आहे. हो असे काहीतरी म्हणतो)... तुझी ती पाण्यात भिरकावून दिलेली वस्तु... जा घेऊन... का मी द्यायला हवी ती तुझ्या हातात... (कीचक पाण्याजवळ जाऊन वाकून ती वस्तु पाण्यातून बाहेर काढतो. ती एक पळी आहे. वेडावत ती त्याच्या हाती देतो. बल्लव उद्दाम-पणाने त्याच्या हातातून हिसकावून घेतो) मिळाली... कशाला हवी आहे रे तुला ती...

**बल्लव :** जो कोणी एखाद्या निरपराध स्त्रीला खोटारडी, ढोंगी म्हणतो त्याचं टाळकं शेकण्यासाठी— त्याचा चेंदामेंदा करण्यासाठी...

**कीचक :** बोलणं सोपं असलं तरी करणं कठीण आहे (मोठमोठ्यानं हसत) नि कां नाही.. काल भर दरबारात न्यायमूर्तींचा शब्द मी शिरसावंद्य मानीन असं म्हटलं का नाही ते हिलाच विचार. मी पसंत करेन त्या उच्च पदस्थ व्यक्तीशी लग्न करण्याचं तिनं मान्य केलं किंवा नाही... हेहि विचार हिला... आता ही सांगते

अनुक्रमणिका






आहे की तूं तिचा पति नि प्रियकर आहेस... तूं राजकुलोत्पन्नहि नाहीस नि उच्चपदस्थ तर नाहीच नाहीस... आणि...

**बल्लव** : तिला विचारायची काहीच जरूर नाही... मला ठाऊक आहे...

**कीचक** : काय ठाऊक आहे ?

**बल्लव** : सारं काही ठाऊक आहे.

**कीचक** : सारं ?

**बल्लव** : हो- हो... सारं सारं काही ठाऊक आहे...

**कीचक** : तुमची ओळख वरीच जुनी असली पाहिजे ?

**बल्लव** : होय !

**कीचक** : (चढत्या रागाने) काय... ग... खरं आहे हे ?

**सैरंध्री** : (शांतपणे) होय !

**कीचक** : मी नि ताई किती मूर्ख आहोत.. आपण कोणीतरी राजकन्या असून वाईट दिवस आल्यानं आश्रय मागायला ताईकडं आलीस असं जे तूं सांगितलंस ते सारं खोटं आहे... तुझं लग्न कोणाही मानवी व्यक्तीशी झालं नसून तुला पांच पति देव आहेत... हेही खोटं... तूं सपशेल खोटं बोलून फसवलंस.. स्त्रियांच्या खोटेपणाची कमाल आहे... तुझ्याइतकं धादांत खोटं बोलणारी दुसरी स्त्री या पृथ्वीवर अन्यत्र कोठेच नसेल.. तुझ्या चेहऱ्यावरील अपराधी भाव मला स्पष्ट दिसताहेत... चंद्रप्रकाशाइतकं हे सत्य आहे... तूं सांगतेस की तुमची जुनी ओळख आहे... तुमच्या दोघांची काहीतरी मसलत चालली आहे... चांडाळणी ! या शांत नि समृद्ध राज्यातलं तुला हवं आहे तरी काय ? सम्राज्ञीची दासी आणि पाकशाळेचा प्रमुख—ही सोंग घेऊन हेरगिरी करायला तुम्ही दुसऱ्या राज्यातनं इथं आला आहात ! उद्या साऱ्या दरबाराला हे कळल्याशिवाय राहणार नाही... नि धर्मराजतुल्य न्यायमूर्तीपुढं तुमचा निवाडा केला जाईल—हे पक्कं लक्षात ठेवा. (कडवटपणे हंसत)...नि आता सुद्धा मी स्वत:...तूं खरोखरच अडचणीत सांपडलेली एखादी राजकन्या असून स्वसंरक्षणासाठी तुला एखाद्या राजबिंड्या समर्थ बाहूंची आवश्यकता आहे असं मानून मी माझाच हात तुझ्यासाठी पुढं करणार होतो... जिचा आचारी-पाणके, क्षुद्र नोकर-चाकर यांच्याशी-देव जाणे कसला-गलिच्छ संबंध आहे—अशा नालायक नि हलकट स्त्रीपुढं हा माझा हात पसरला गेला असता... साऱ्या प्रजाजनास हे कळलंच पाहिजे नि उद्या तुम्हाला जबर शिक्षा व्हायला हवी... पण ती तरी उद्या कां ? आमच्या न्यायमूर्तींचा निर्णय धुडकावून लावण्यासाठी अशी युक्ति योजलीस काय ? पण तूं त्यातनं बरी सुटशील ! (सैरंध्रीला उद्देशून उद्धटपणे) चल चालती हो नि मुकाट्यानं माझ्या मंदिरात सकाळपर्यंत बसून रहा... हलायचं नाही तिथून... (बल्लवास उद्देशून) तुझं हे हत्यार का काय आहे... कीचकाच्या डोक्याचा त्यानं चेंदामेंदा करण्याच्या वढाया मारत होतास ना... तुझेच हातपाय मुरगाळून टाकतो इथल्या इथं नि मग बघतो तूं सकाळपर्यंत इथनं कसा हालतोस..

**बल्लव** : (मोठमोठ्याने हंसत) व्यर्थ होणार आहे तुझं सारं












बोलणं... माझी ही पळी दिसायला हलकी फुलकी असली तरी गदेप्रमाणं प्रभावी आहे... केवळ एका प्रहारानं तुझा चेहरा ठेचून टाकून ओळख सुद्धा न पटण्याइतका विद्रूप करून टाकण्याची तिच्यात ताकद आहे.. दाखवू का थोडा मासला ?.. (बल्लव कीचकाच्या तोंडावर पळीचा प्रहार करतो, परंतु कीचक मोठ्या युक्तीने तो चुकवतो नि बल्लवाच्या हातातून ती काढून घेऊन पुन्हा कारंजाच्या पाण्यात भिरकावून देतो.)

**कीचक** : (मोठमोठ्याने हंसत) आता काढ ती पाण्यातनं... तुझी पळी... का पुन्हा मीच काढून देऊ तुझ्या हातात... म्हणजे सकाळपर्यंत माझं डोकं चेचत तुला बसता येईल... मलाहि रात्रभर ही करमणूक छान आहे.... (बल्लवाचे बाहु स्फुरण पावू लागतात. मुष्टीयुद्धाचा तो प्रयत्न करीत आहे हे कीचक ओळखतो नि कुत्सितपणे हंसतो).. तुझ्या त्या शस्त्राशिवायहि माझं तोंड फोडण्याचा तुझा विचार दिसतो आहे...

**बल्लव** : तेहि मी करू शकेन !

**कीचक** : मग थांबतोस कशाला ? मी माझा काही चेहरा झाकून ठेवलेला नाही...(प्रहार करावा की नाही याचा बल्लवाने अद्याप निर्णय घेतलेला नाही. त्याची चुळबुळ चालली असून सैरंध्रीकडे तो रागाने पाहतो.).. तूं काय लढतोस ते मला ठाऊक आहे. हातात शस्त्र असल्याशिवाय या कीचकाशी दोन हात करणं तुला कधीच जमणार नाही...ह्या पृथ्वीतलावर फक्त चारच व्यक्ति अशा आहेत कीं ज्या माझ्याशी शस्त्राशिवाय लढू शकतात– तूं शतजन्म घेतलेस तरी या चारात तुझी गणना होऊ शकणार नाही... चल चालता हो... तूं एक यःकश्चित् क्षुद्र नोकर... अडाणी माणसा–अजिंक्य कीचका-बरोबर लढण्याची भाषा बोलतोस ?... शी... ए सटवे.. तो लढू शकत नाही... म्हणजेच तूंहि माझ्या हातून सुटू शकत नाहीस... (सैरंध्रीला तो आपल्या मंदिराकडे ओढत नेण्यासाठी हात पुढे करतो.)

**बल्लव** : तिच्या अंगावर हात तर टाकून पहा.. नाही तुला इथल्या इथं ठार केला...

**कीचक** : (बल्लवाकडे वळून मोठमोठ्याने हंसतो–) अभिनय तर मोठा छान करता येतो तुला ! नाटकात कामं बिमं करतोस काय?... भल्या माणसा, स्वतःला नीट सांभाळ म्हणजे पुरे... ए पोरटे... चल..! पुन्हा तिला धरू पहातो–)

**बल्लव** : (मुष्टियुद्ध करण्याचा निश्चय करून) नाटकात कामं करतोस का म्हणून विचारलंस ना !...मग हे बघ तर (बल्लव कीचकाच्या जवळपास एक प्रहार करतो, पण तो चुकवून त्याहून मोठा टोला कीचक बल्लवाच्या तोंडावर हाणतो. तो इतका तीव्र असतो की बल्लव तिरिमिरी मागे जातो.. नि मागील कारंजावर जाऊन आदळतो.. अतिशय रागाने तो उठतो. धापा टाकतो.)

**कीचक** : काय कसा वाटला हा मासला ? माझ्याशी लढण्याची भाषा करतोस काय ? (कीचकावर बल्लव पुन्हा प्रहार करायला जातो परंतु तो चुकवून कीचक त्याला पुन्हा इतक्या जोरात प्रतिटोला देतो कीं यावेळी तो पाण्यातच जाऊन पडतो. तो रागाने पुन्हा बाहेर येतो व मुठी वळवून सैरंध्रीकडे पहातो–)

**बल्लव** : तुझं संरक्षण करण्यासाठी मला किती यातना सोसाव्या लागताहेत ते पहा...

**सैरंध्री** : (बल्लव आणि कीचक यांची प्रत्येक हालचाल सूक्ष्म पण अवलोकन करीत असून बल्लवाच्या अपयशाने तिच्या डोळ्यात अश्रु उभे राहतात. बल्लवास उद्देशून) तूं कोण आहेस याची आठवण ठेव... ह्याच्याशी नीट लढत कां नाहीस... उगाच पराभव कां स्वीकारतोस ? या डुकराला तू जिंकू शकत नाहीस ?

**कीचक** : (रागाने) स्वत्वाची जाणीव करून देण्यासाठी स्त्रीच्या प्रोत्साहनाची आवश्यकता भासते अं ! अगदीच भित्रा दिसतो आहे. अगदीच बायल्या.. (पाण्याने भिजलेला बल्लव थरथरत आहे, कीचकाला त्याचा भीतीने थरकांप होत आहे असे वाटते.)... पहा कसा भीतीनं थरथरतो आहे.. शिवाय पाण्यानं नखशिखान्त भिजला आहेस. मनापासून लढायला हा काही पुरुष दिसत नाही. एखाद्या स्त्रीचाच पोषाख याला अधिक शोभून दिसेल. (सैरंध्रीला उद्देशून) ए बटिके, जागची हालू नकोस.. ह्याच्यासाठी मी नवे कपडे घेऊन येतो. (काही पावले चालून थोडा थांबतो)... मी विसरलोच कीं याला स्त्रीचाच पोषाख द्यायला हवा. (सैरंध्रीला) तूंच तुझ्या खोलीकडे जाऊन याच्यासाठी तुझं एक लुगडं घेऊन ये (सैरंध्री जागची हालत नाही) मी कुणाला सांगतो आहे ? आत्ताच्या आत्ता जाऊन आणतेस की नाही एक लुगडं ? (सैरंध्रीजवळ जाताच तिच्या अंगावरची शाल त्याला दिसते.).. नाहीतर ही तुझी शालच ह्याला दे. (तरी सुद्धा जागची तसूभर सुद्धा हालत नाही. कीचक सैरंध्रीच्या खांद्यावरचा पदर फरफरा ओढतो, त्याचा एक धडपा फाडून बल्लवाच्या अंगावर फेकतो.) घे हे वस्त्र नि नेस...

[बल्लवाला विलक्षण राग आला असला तरी आपली ओळख पटू नये म्हणून तो शांत राहतो. त्याच्या डोळ्यात पाणी येते. सैरंध्रीचे डोळे अंगारासारखे लाल होतात.]

**सैरंध्री** : (मनाचा तोल जाऊन) ह्याच्या खोचक बोलण्यानं तूं काय खरोखरच बांगड्या भरणार आहेस ? खरा शूर आहेस म्हणायचा ! तूं ज्या भ्रमात वावरत आहेस तो दूर कर नि वीरासारखा लढ. तुझ्या पुरुषत्वाची याला चांगली जाणीव करून दे.

**कीचक** : (बल्लवाच्या अंगावर फेकलेला वस्त्राचा तुकडा त्याला नेसवत असतांना त्याच्या कमावलेल्या बाहूचा स्पर्श त्याला जाणवतो.) तूं दिसतो आहेस मल्लासारखा...परंतु तिच्या निरर्थक ओरडण्याप्रमाणं या कीचकाशी लढण्याकरिता तुझ्यातला खरा पुरुष जागा व्हायला हवा... कीचक सुद्धा तुझ्याशी लढला तर धर्मानेच लढेल... माझ्या पोलादी मुठीचे घाव सहन करण्याची जर तुझ्या शरीरात ताकद असेल तर असा पुढं ये... पलीकडच्या नृत्यशाळेतच जाऊ या... तिथं आखाड्यात पाहिजे तर शस्त्रांसह अथवा निःशस्त्र रीतीने सुद्धा खेळता येईल... तूं भिजला आहेस नाही... ओले कपडे टाक काढून नि हे पटकूर घे गुंडाळून..चल..एकाच बुक्कीनं तुला जमिनीवरच असा लोळवतो कीं उद्या दरबारला जाईपर्यंत तूं तिथंच निपचित पडून रहाशील...चला तुम्ही दोघेहि... कीचक कसा अजिंक्य आहे नि शब्दाला जागणारा आहे हे ह्या नीच बाईला तरी कळू दे... तूं जरी हलक्या कुळात जन्माला आला असलास नि तुझा व्यवसाय जरी अत्यंत क्षुद्र – आचाऱ्याचा असला–तूं जरी आमचा एक यःकश्चित दास असलास तरी तुझ्याशीहि लढण्यास मी तयार आहे. ये.. ए तूं तिकडून ये, नि ए बये, तूं माझ्या मागोमाग ये...

[त्यांना घेऊन कीचक जातो.]

**(क्रमशः)**








चार
चार
चार
चार





# चार

## या आकड्याच्या क्रिकेटमधील मौजा सांगणारा लेख

# चन्द्र चवथीचा



वसन्त नाईक

'चन्द्र चवथीचा' कविवर्यांनी चतुर्थीच्या चन्द्रात काहीतरी विशेष आहे, असेच या ओळीने सुचविले आहे. चार या आकड्यात इतरापेक्षा विशेष असते असे आणखी काही दाखल्यानी सिद्ध करता येईल. कविकुलगुरु कालिदासाच्या शाकुंतलातील चौथ्या अंकाची गोडी अधिक व त्यातही पुन्हा चार श्लोक जास्त रम्य. (काव्येषु नाटकं रम्यं, तत्र रम्यं शकुंतलं, तत्रापि च चतुर्थोकः, तत्र श्लोक चतुष्टयम्) चांडाळ चौकडी, चार वेद, चातुर्वर्ण, चातुर्मास, चार दिशा, वगैरे आवळ्या-भोपळ्यांच्या मोटीतही चार या आकड्यांचे आगळेपण जाणवावे. क्रिकेट व इतर काही खेळ यातही चार या आकड्याचे महत्व पहावे. फलंदाजाने चौकार किती मारले याचा नेहमी उल्लेख केला जातो. कुस्तीमध्ये चारीमुंड्या चीत हा वाक्प्रचार तर सुपरिचित आहेच.

निरनिराळ्या देशात खेळल्या गेलेल्या क्रिकेटच्या कसोटी सामन्यातील चौथ्या कसोटी सामन्यात जेवढे विक्रम व अपूर्व प्रसंग घडले आहेत, तितके अन्य कोणत्याही सामन्यात घडले नाहीत असे तपशीलात शिरल्यावर आढळून येते.

कसोटी सामन्यात दोन्ही डावात वैयक्तिक शतक काढणारे क्रिकेटवीर फक्त हाताच्या बोटावर मोजण्याइतके आहेत. त्यापैकी पाच खेळाडूनी हा विक्रम चौथ्या कसोटी सामन्यात केला आहे. विलक्षण योगायोगाची गोष्ट अशी की हा विक्रम प्रत्येक वेळी ऑस्ट्रेलियातील ॲडिलेड या मैदानावर घडला. १९२८ साली इंग्लंडच्या वॉल्टर हॅमंडने प्रथम दोन्ही डावात शतके झळकवली. त्यानंतर १९४७ मध्ये इग्लंडचा डेनिस कॉम्पटन व ऑस्ट्रेलियाचा ऑर्थर मॉरिस यांनी एकाच सामन्यात परस्पर संघाविरुद्ध हा विक्रम केला. भारताला भूषणास्पद असा विक्रम पुढल्याच वर्षी विजय हजारेने केला व त्यानंतर तब्बल १२ वर्षांनी वेस्ट इंडीजचा रोहन कन्हाई या मालिकेत जाऊन बसला.

कसोटी सामन्यातील पदार्पणात शतक काढणे हाही एक दुर्मिळ मान आहे. सुमारे १०-१२ खेळाडूंनीच हा बहुमान संपादला आहे. त्यापैकी आर्कि जॅकसन (ऑस्ट्रेलिया १९२८), जिमबर्क (ऑस्ट्रेलिया १९५४) भारताचे अब्बास अल्ली बेग (१९५९) व हनुमंतसिंग (१९६४) या सर्वांनी त्या त्या मालिकेतील चौथ्या सामन्यात हा विक्रम केला. ऑस्ट्रेलियाचा आणखी एक खेळाडू नील हार्वे याने इंग्लंडविरुद्ध कसोटी सामन्यात पदार्पण करताना शतकाने सुरुवात चौथ्या सामन्यातच केली. (पण तत्पूर्वी तो भारतीय संघाविरुद्ध २ कसोटी सामने खेळला होता.)

फलंदाजीतील आणखी काही विक्रम चौथ्या कसोटी सामन्यातच घडले. दोन्ही संघाच्या पहिल्या डावातील धावा ६००च्या वर जाण्याचा एकमेव प्रसंग म्हणजे १९५४ सालचा चौथा सामना, ऑस्ट्रेलियाने ६५६ धावा केल्या तर इंग्लंडने ६११. याच सामन्यात ऑस्ट्रेलियाचा कर्णधार बॉबी सिम्पसन ३०० च्या वर धावा करणारा ब्रॅडमननंतरचा पहिलाच ऑस्ट्रेलियन खेळाडू ठरला. कसोटी सामन्यात ३०० च्या वर २ वेळा धावा रचणारा फक्त एकच खेळाडू होय. तो म्हणजे ब्रॅडमन. त्याने दुसऱ्या वेळी ३००च्या







वर घावा केल्या. त्या १९३४ सालच्या चौथ्या कसोटी सामन्यातच.

भारताचा कसोटी सामन्यातील उच्चांक ५३९ धावाचा आहे. सदर उच्चांक १९६१ सालच्या चौथ्या कसोटी सामन्यातच पाकिस्तानविरुद्ध प्रस्थापित केला गेला.

केवळ कसोटी सामन्यातच नव्हे तर अन्य सामन्यातही चार या आकड्यांचे वेगळेपण प्रकर्षाने जाणवते. प्रथम श्रेणीच्या क्रिकेट सामन्यातील भागिदारीचा उच्चांक चौथ्या भागिदारीत आहे. भारताचीच जोडी विजय हजारे व गुलमहमद त्यानी १९४७ साली बडोदा विरुद्ध होळकर या रणजी करंडक सामन्यात ५७७ धावांची भर घालून जागतिक विक्रम निर्माण केला. त्यानी तो विक्रम मोडला तोही चौथ्या भागीदारीतील ५७४ धावांचा होता आणि हा वेस्ठ इंडिजचे वॉरेल व वॉलकॉट यांनी एकच वर्षापूर्वी रचला होता.

हे सर्व झाले फलंदाजीतील विक्रम. पण इंग्लंडच्या जिम लेकर याने १९५६ साली गोलंदाजीत केलेला विक्रम 'न भूतो न भविष्यति' ठरणार. या वहाद्दराने चौथ्या कसोटी सामन्यात पहिल्या डावात प्रतिपक्षाचे (ऑस्ट्रेलिया) ५३ धावात ९ व दुसऱ्या डावात सर्व दहाच्या दहा बळी ३७ धावात घेऊन एकूण ९० धावात १९ बळी घेतले.

काही विचित्र विक्रमसुद्धा चौथ्या कसोटी सामन्यातच घडावे यावरूनही चार या आंकड्याचे वेगळेपण सार्थ होते. भारतात अनेक कसोटी सामने अनिर्णीत राहतात. फलंदाजाच्या कातडीबचावू खेळामुळे नेहमी असे घडत आले आहे. पण भारतात गेल्या ३५ वर्षातील कसोटी सामन्यांच्या इतिहासात फक्त एकच सामना पावसामुळे अनिर्णीत राहिला तो होता पाक संघाविरुद्धचा १९५२ सालचा चौथा कसोटी सामना. पावसावरून विषय निघाला म्हणून आणखी एक 'विक्रम' नमूद करावासा वाटतो. खेळपट्टी खेळण्यास योग्य की अयोग्य याचा निर्णय अंपायरकडे असतो. त्याप्रमाणे १९५३ साली भारताचा वेस्ट इंडीजमधील चौथा कसोटी सामना सुरू होण्यापूर्वी पावसामुळे खेळ होऊ शकणार नाही असे अंपायरानी ठरविले. पण जे आतापर्यंत घडले नाही ते त्यावेळी घडले. प्रेक्षकांनी खेळ सुरू झालाच पाहिजे असा गिल्ला सुरू केला. वेस्ट इंडीजमधील दमदार प्रेक्षक ते? सोड्याच्या बाटल्या वगैरे आयुधानी सदैव सज्ज. आणि विश्वास ठेवा अगर न ठेवा खेळ सुरू झाला. गिन्हाईकांचा संतोष हाच आमचा फायदा या व्यापारी न्यायाचाच थोडा बदल केलेला हा प्रकार म्हणावयाचा. याच सामन्यात दुसरी योगायोगाची गोष्ट म्हणजे दोन्ही संघाच्या कर्णधारांचा वाढदिवस एकाच दिवशी साजरा होत होता. आणि तोही सामना चालू असतानाच. वेस्ट इंडीजचा कर्णधार जेफ स्टॉलमेयर व भारताचा कर्णधार विजय हजारे यांचा जन्म एकाच दिवशी म्हणजे ११ मार्च रोजी झाला.

कसोटी सामन्यात अनेकानी शतके काढली आहेत. काहीनी पहिल्याच डावात तर इतरांनी काही थोड्याच डावानंतर. पण क्रिकेटच्या इतिहासात एक अपूर्व उदाहरण १९६५ साली चौथ्या कसोटी सामन्यात घडले. ते म्हणजे दक्षिण आफ्रिकेचा गोडार्ड याने सर्वात उशीरा म्हणजे ३२ व्या कसोटी सामन्यात, ६२ डावानंतर पहिले वहिले शतक काढले.

षट्कार मारून कसोटी सामना संपविण्याचा पहिला विक्रम १९३३ मध्ये इंग्लंडचा पेंटर याने चौथ्याच सामन्यात मिळवला. मौज अशी की यानंतरचा सामनाही षट्कारानेच संपला. यावेळी इंग्लंडच्या हॅमंडने हा मान मिळवला.

भारताचा कसोटीवीर विजय हजारे याच्या नावावर अनेक विक्रम आहेत. पण त्यानेच दोन्ही डावांत शतकाबरोबर भोपळाही काढण्याचा शंकास्पद विक्रम १९५२ साली कानपूर येथे प्रस्थापित करून 'पूर्ण क्रिकेटर' हा किताब संपादला. हा कानपूर येथील चौथाच कसोटी सामना होता.

अंपायरच्या निर्णयामधील सर्वात अधिक गाजलेले तीन निर्णय त्या त्या वर्षीच्या चौथ्या सामन्यातच घडले आहेत. १९५३ सालच्या लीड्स येथील चौथ्या सामन्यात इंग्लंडचा एक खेळाडू धावचीत असल्याचा ऑस्ट्रेलियनांचा दावा होता. पण तो मान्य न केल्याबद्दल त्यांनी चेस्टर या पंचाविरुद्ध इतकी हाकाटी केली की शेवटच्या सामन्यात हा जगप्रसिद्ध अंपायर 'उभा' राहिला नाही. व त्याची कारकीर्दी संपुष्टात आली. 'हे फल काय मम तपाला' असेच उद्गार बिचाऱ्याने काढले असतील.

असाच प्रसंग चार वर्षानंतर ऑस्ट्रेलियात घडला. मात्र यावेळी बाद न दिलेला खेळाडू ऑस्ट्रेलियाचा मॅक्डोनल्ड होता व पंचही ऑस्ट्रेलियन मॅकइनिस हा होता. त्याच्या निर्णयामुळे वादंग माजले व परिणामी मॅकइनिस 'निवृत्त' झाला.

अलिकडे म्हणजे १९६५ साली असाच एक पंचप्रसंग (की पंच प्रसंग!) दक्षिण आफ्रिकेत चौथा कसोटी सामना चालू होता. इंग्लंडचा कर्णधार स्मिथ हा खेळत असताना एक चेंडू त्याच्या बॅटीला स्पर्श न करता यष्टिरक्षकाकडे गेला. त्याने तो चेंडू शेजारच्या क्षेत्ररक्षकाकडे टाकला. त्याचा उद्देश असा की सदर चेंडू गोलंदाजाकडे परत फेकला जावा. पण त्या क्षेत्ररक्षकाने पाहिले की स्मिथ लक्ष्मणरेषा (क्रीज) सोडून पुढे गेला आहे. म्हणून त्याने चेंडू त्रिफळयावर मारला. व पंचाकडे निर्णय मागितला. पंचाला स्मिथला बाद देणे भाग पडले. त्याप्रमाणे स्मिथ 'बाद' होऊन जवळ जवळ तंबूपर्यंत पोचला सुद्धा. इतक्यात दक्षिण आफ्रिकेच्या कर्णधाराच्या ध्यानात सर्व प्रकार आला. त्याने यष्टिरक्षक व सदर क्षेत्ररक्षक यांच्याशी विचारविनिमय करून निर्णय घेतला की स्मिथ बाद नाही. कारण चेंडू 'डेड' झाला होता. त्याप्रमाणे त्याने पंचाला पहिला निर्णय फिरविण्याचे आवाहन केले. पंचाने त्याचे म्हणणे मान्य करून स्मिथला परत खेळावयास पाचारण केले व स्मिथ पुन्हा खेळला.

वरील सर्व प्रसंगावरून चार या आकड्यांची अपूर्वाई आहे असे वाटल्यावांचून रहात नाही.

★★★

अनुक्रमणिका








अनुक्रमणिका



—सरिता पद्‌की

# घु स्म ट

**थरथरणारे ओठ आवळून धरते तरी रडू फुटलंच. कोसळलंच. दाबून धरलेल्या रुमालाला न जुमानता हुंदके बाहेर पडू लागले. सगळं अंगच मुळी गदगदायला लागलं....**



**दाराच्या** फळीला एका दंडानं टेकून ती सांगत होती. 'बसा' म्हणून सांगूनही तिनं ऐकलं नव्हतं. हट्टानं ती उभीच राहिली होती. तांबुसगोरा रंग, दरदरीत नाक, ठोसर जिवणी, पिंगट रंगाचे डोळे, कपाळावर कोसळलेल्या बटा, जेमतेम खांद्यापर्यंत पोचेलसा पदर. अठराएकोणीसचं वय. पण डोळ्यामध्ये काय काय पेटलेलं? संताप, अपमान, शरम! कोरड्या पडलेल्या, थरथरत्या आवाजात ती सांगत होती—

अन् सुमति ऐकत होती. ऐकता ऐकता विचार करीत होती 'ही कोण?' तसं दार उघडल्यावर तिला 'तुम्ही कोण?' म्हणून विचारलं होतं. अन् तिनंही काहीतरी नांव सांगितलं होतं. पण सुमतीला ते उमगलं नव्हतं. ज्या झटक्यानं आत येऊन मधल्या खोलीचा पडदा बाजूला सारून ती दाराशी उभी राहिली होती त्या झटक्याच्या आश्चर्यातच ते नांव बुडालं होतं. अन् खरं तर ती जे सांगत होती ते ऐकताना तिचं नांव कळायची मुळी जरूरीच नव्हती! ओघळलेले गाल, विरळलेले दात, फिकट झालेले डोळे—या आपल्या वयस्कपणातून सुमति ऐकत होती. तिला गद्‌गदताना ऐकत होती. दांत एकमेकांवर दाबून, जिभेचे चाळे करीत वेगळीच भाषा बोलणाऱ्या त्या नव्या मुलीची व्यथा ऐकत होती. . .

"तीन दिवस रडले बाई मी सारखी! अहो, असं घडलं असं सांगणार तरी कुणाला? सांगायचं नाही ठरवलं तरी मला आपलं सारखं रडू येत होतं. आपलं सहज, असं नुसतं येता जाता. जेवायच्या पाटावर, कॉलेजातल्या बाकावर, लायब्ररीत, अंथरुणावर पडल्या-पडल्या. मैत्रिणी विचारायला लागल्या 'अगबाई रडतेयस तरी कां अशी?' पण काय सांगणार? शेवटी एकदा माझ्या अगदी जिवाभावाच्या मैत्रिणीच्या मांडीवर डोकं ठेवून भरपूर रडून घेतलं. रडताना तिला सांगितलं मात्र, कां रडतेयस म्हणून विचारायचं नाही."







अनुक्रमणिका

पण असली गोष्ट मनात तरी किती वेळ दाबून धरणार ? अन् मग एकदम मनात आलं की तुम्हालाच येऊन सांगावं. तुमच्या-इतकं योग्य माणूस कोण मिळणार हे ऐकायला ?

कोण ही ? कोण ? अन् असं भयंकर सांगणार तरी आहे काय ? सुमतीला काहीच कळेना. उगीच अपेक्षेनं तिचं अंग थर-थरायला मात्र लागलं.

"तर झालं काय बाई, त्या दिवशी काहीतरी डिफिकल्टी विचा-रायला म्हणून मी सरांच्या केबिनमध्ये गेले. तुमच्या यजमानांच्या. तशा नेहमीच जातो आम्ही. असं चारपांचच्या सुमाराला गेलं की ते मोकळेच असतात. मोकळेपणानं समजावून सांगतात सगळं. म्हणून आम्ही तेव्हाच जातो. परवा तशीच मी एकटीच गेले. काय विचारायचं होतं ते विचारलं. त्यानी पण समजावून सांगितलं. अन् मग मी परत जायला म्हणून उठले. तर... तर निरोप द्यायला आल्यासारखे सर जवळ आले, एकदमच त्यानी माझ्या खांद्यावर हात ठेवला अन् म्हणाले.... म्हणाले – गिव्ह – अस् – ए – किस् ! .... आधी मला त्या शब्दांचा अर्थच कळेना. अन् कळला तेव्हा...

थरथरणारे ओठ आवळून धरले तरी रडू फुटलंच. कोसळलंच. दाबून धरलेल्या रुमालाला न जुमानता हुंदके बाहेर पडू लागले. सगळं अंगच मुळी गदगदायला लागलं !

तिला समजावायला पाहिजे हे कळूनही सुमतीचा हात पुढे होईना. अपमान – शरम – अगतिकता सारं दाटून येऊन तीही थरथरायला लागली. त्या पोरीसमोर रडायचा लाजिरवाणा प्रसंग मात्र तिनं स्वतःवर येऊ दिला नाही–केवढ्या हिमतीनं !

गिव्ह अस अ किस् !... किस्–चुम्बन ! आपल्याय जमानांच्या तोंडचे हे शब्द ! आपल्यापेक्षा वयस्क झालेल्या यजमानांच्या तोंडचे ! आज कितीतरी वर्षं त्यांची अंथरुणंसुद्धा वेगवेगळी पडत होती. सहजच झालं होतं ते. प्रौढ झालेली शरीरं आपापल्या व्यवसायांनी दमून केव्हाच झोपेच्या आधीन होऊ लागली होती. आणि त्याना निष्कारण फटकारावयी जरुरी वाटली नव्हती– एकमेकांवरच्या विश्वासामुळे ! सारंच बिनतक्रार, विनासायास होत गेलं होतं.

आणि आता हे –गिव्ह अस अ किस् ! आपल्या साऱ्या संसारावर नवऱ्यानं एक पिंक टाकली असं तिला वाटायला लागलं. अन् ती पडायची जशी टाळता आली नाही तशी पुसताही येणार नाही म्हणून ती प्रक्षुब्ध होऊन उठली. शरम-संताप– अपमान – वैताग– अगतिकता. तिचा प्रक्षोभ तिलाच आवरेना. उभ्या उभ्या तोल सुटून आपण जमिनीवर कोसळू असं तिला वाटलं.

मग केव्हातरी सुमतीला ती दिसली. रडणारी, घायाळ झालेली. विव्हळणारी. स्वतःला सावरून तिनं तिच्या पाठीवर हात ठेवला, तिला कुरवाळलं. आणि थोपटत म्हणाली "हे पहा, तुम्ही इतकं वाईट वाटून घेऊ नका. स्वतःचं मन नासवून घेऊ नका. अजून लहान आहात तुम्ही. असा एखादा प्रसंग आला तर एवढ्या बेभान होऊ नका. अन् खरं सांगू का ? आज इतकी वर्षं कॉलेजात शिकवताहेत ते, इतक्या मुली त्यांच्याकडे येतात जातात, कध्धी तक्रार आली नाही त्यांच्या बद्दल. आता तुमचंच नशीब खोटं म्हणायचं. तरी काही घाणेरडं होऊ दिलेलं नाही तुम्ही. फार शहाण्यासारख्या वागलात. वेळेवर सावध झालात. जा आता. एवढं मनाला लावून घेऊ नका. अन् यांच्याबद्दलही काहीतरी मनात ठेवू नका. पुन्हा कधी असलं होणार नाही त्यांच्या हातानं ! मी सांगते तुम्हाला. बायको आहे ना मी त्यांची ? माझ्यावर विश्वास ठेवा. जा आता–जा."

तिला घालवलं, दाराला कडी घातली, खालचेवरचे बोल्ट पक्के घातले अन् सुमति सोफ्यावर कोसळली. इतका वेळ आवरलेलं रडं प्रौढ शरीरावर मात करून तुटून पडलं. त्यानं सुमतीचा कब्जाच घेतला !. . . .

खरंच, खरंच का हे एकदाचं असं होईल ? एकदाचं असं होऊन थांबेल ? त्यांचं त्यानाच नसेल का काही वाटलं ? चुकलो, गैर वागलो असं ?

पण आपण तरी एवढ्या कां वहावून जातोय ? नुसतं म्हटलं ना त्यानी तसं ? केलं तर नाही ना काही? नाहीतर इतरांचे नवरे कसे असतात–काय काय ऐकायला येतं कुणाकुणाचं ! त्या बायकांनी कसं करायचं ? असं रडायचं ? इतकं ? अरे, मनुष्य प्राणी आहे चुकायचाच ! म्हणून काय. . . .

स्वतःचीच समजूत घालीत सुमति कितीतरी वेळ बसल्या जागीच बसून रहाते. स्वतःचं मन इतकं ताब्यातनं जाऊ दिल्या-बद्दल, एवढ्या भरल्या संसारात एवढं काळीज तोडून रडल्याबद्दल अन् तेही एवढ्याशा कारणासाठी – स्वतःला दोष देते. एवढं कसं आपलं मन हलकं म्हणते. इतक्या वर्षांचा संसार, निष्ठा, कष्ट, जिव्हाळा––सारं त्या एका वाक्यानं गेलं त्या माणसाचं ? एका नामवन्त कॉलेजातल्या नामवन्त प्राध्यापकाचं ? हॅं:ऽ !

स्वतःच्या वेडेपणाला हंसत सुमति उठते. घसरलेली साडी सारखी करते, केसावरनं कंगवा फिरवते, विस्कटलेलं कुंकू नीट करते अन् मोकळ्या वाऱ्यावर म्हणून गॅलरीत उभी रहाते.

सहज वळणावर नजर टाकते तर तिचे यजमानच येत असतात. यजमान –– अन् बरोबर मिसेस् देशपांडे. इंग्लिशच्या. आपल्या-बरोबरीच्या असूनही आपल्यापेक्षा कितीतरी लहान दिसणाऱ्या. तरतरीत, बद्धिमान हसून बोलणाऱ्या ! अन् आपले यजमानही किती रंगून बोलताहेत तिच्याशी! गप्पांच्या भरात भराभर चाल-ताहेत–– खरेच तरुण दिसहेतात, तिच्या – तिच्या बरोबरीचे !

आता ते घरी येणार. ती दोघं. दोघं हंसणार, बोलणार, विनोद करणार ! दोघं !

सुमतीला काहीच कळेनासं होतं. दोघं बरोबर आली म्हणून काय झालं ? रंगून बोलत असली म्हणून काय झालं ? त्या तिला गिव्ह अस अ किस् म्हटलं असलं म्हणून ? म्हणून लगेच पण...? शोभ-तात का आपल्याला इतके हलके विचार ? एखाद्या अशिक्षित, अडाणी बाईसारखे ?

पण कशावरून काही झालं नाही ? कसं म्हणायचं काही झालं नाहीच म्हणून ? कां येऊ नयेत असले विचार माझ्या मनात ? बायको आहे ना मी त्यांची ? संसार केलाय ना इतकी वर्षं त्यांच्याशी मी ? निष्ठेनं ? काडीइतकं गैर न वागता ? ऐन तरुणपणात सुद्धां गैर न वागता ? मग त्यानी कां असं.... कां... असं ? पण... तरीपण....! सुमति भोवंडते, घुस्मटते.

आता दाराची घंटा वाजणार, दार उघडावं लागणार. ती दोघं येणार. . . . दोघं !. . .

सुमति झटकन् उठते. घरात जाते. बाथरूममध्ये शिरते. बाथरूमची कडी घट्ट लावून घेते.

अन् दोन्ही कानावर गच्च हात धरून उभी रहाते ! गच्च... अगदी गच्च !

●●●

# ते आले, त्यानी पाहिले व त्यानी जिंकले



अशी ख्याती मिळविणाऱ्या भारतीय शालेय क्रिकेट संघाचे इंग्लंडच्या दौऱ्यातील कप्तान

## अजित नाईक

याची प्रा. अविनाश केळकर यांनी 'दीपावली'साठी घेतलेली खास मुलाखत

**भारतीय** क्रिकेट संघ पतौडीच्या नेतृत्वाखाली नुकताच इंग्लंडचा दौरा करून मायदेशी परत आला. तेथे झालेल्या तिन्ही कसोटी सामन्यात आमचा संघ पराभूत झाला. हा दौरा चालू असतानाच आमचा शाळकरी मुलांचा क्रिकेटसंघही यंदा प्रथमच इंग्लंडमध्ये गेला होता. दहावी अकरावीत शिकणारी पंधरा सोळा वर्षांची ही शाळकरी मुले! त्याना इंग्लंडमधील थंडी आणि बदलते हवामान मानवेल काय? तेथील ओल्या, खराब खेळपट्टीवर ही छोटी मुले काय पराक्रम करणार? असे अनेक प्रश्न हा दौरा सुरू होण्यापूर्वी अनेकांच्या मनात येत होते. पण काय आश्चर्य! आमच्या थोर क्रिकेटपटूंना जमले नाही ते या आमच्या छोटचा, अननुभवी खेळाडूंनी करून दाखविले. गेल्या पस्तीस वर्षात इंग्लंडमध्ये आमचे एकूण सहा दौरे झाले. आजवर आपण तेथे एकूण एकोणीस कसोटी सामने खेळलो. त्यातील पंधरा सामन्यात आमचा संघ सपशेल पराभूत झाला. तर केवळ चार सामनेच आपण अनिर्णित राखू शकलो. त्यातही तीन सामन्यात आपल्यावर पावसाने कृपा केली म्हणूनच आपली अब्रू बचावली. अलिकडच्या दोन्ही दौऱ्यात (१९५९, ६७) तर आम्ही सर्वच्या सर्व कसोटी सामने पराभूत होण्याचा विक्रम (?) केलेला आहे. थोरांनी केलेल्या पराक्रमाच्या या पार्श्वभूमीवर आमच्या शालेय संघाने इंग्लंडमध्ये केलेला पराक्रम अपूर्व आहे. प्रत्येक भारतीयाला अभिमान वाटावा असा अभूतपूर्व आहे. इंग्लंडमध्ये हा संघ एकूण अठरा सामने खेळला. त्यातील नऊ सामने आपण जिंकले. तर आठ सामने आपण सन्मानाने अनिर्णित राखण्यात यश मिळविले. उरलेला एक सामना पावसामुळे होऊ शकला नाही. या अठरा सामन्यांपैकी तीन कसोटी सामनेही होते. त्यातील दोन सामने आमच्या शालेय संघाने जिंकले तर तिसरा सामना अनिर्णित राहिला. या अजिंक्य (undefeated) शाळकरी संघाचा कप्तान होता अजित नाईक आणि व्यवस्थापक होते सुप्रसिद्ध क्रिकेटपटू ले. क. हेमू अधिकारी. या शालेय संघातील सर्वच बाल खेळाडूंनी आपले कौशल्य दाखवून दिले. तथापि उपकप्तान सय्यद किरमानी, लक्ष्मणसिंग, सुरिंदर अमरनाथ यानी फलंदाजीत विशेष कर्तृत्व दाखविले. तर गोलंदाजीत दीपांकार सरकार आणि जसबिर सिंग यानी आपल्या फसव्या, मंदगती गोलंदाजीची कमाल केली. या सर्व खेळाडूंचा अत्यंत कौशल्याने उपयोग करून कर्णधार अजित नाईक यानी विजयश्री आपल्या संघाकडे खेचून आणली. इंग्लंडच्या दौऱ्यातील सर्वच सामने अटीतटीने खेळले गेले. प्रत्येक वेळी हा शालेय संघ निर्धाराने आणि जिद्दीने खेळला. सांघिक भावनेनं लढला. या यशस्वी शाळकरी संघाचे कर्णधार अजित नाईक याला मी भेटायचं ठरविलं व त्याचे दौऱ्यातील अनुभव सांगण्याची आग्रहाची विनंती केली.

अजितचा जन्म १७-१२-१९४९ रोजी मुंबईला झाला. त्याचे वडिल दत्ताराम यशवंत नाईक हे आपल्या विद्यार्थीजीवनात एक नामवंत क्रिकेटपटू होते. "रॉबर्टमनी स्कूल"च्या शालेय संघाचे एक प्रमुख आधारस्तंभ होते. अजितच्या मातुश्री उषा नाईक यानाही क्रिकेटची आवड आहे. क्रिकेट हा अजितच्या रक्तातच आहे. त्याच्या आईवडिलांनी त्याला खूप प्रोत्साहन दिलं. सहाव्या वर्षापासून अजित क्रिकेट खेळू लागला. फूटबॉल, बास्केट बॉल, टेबल टेनिस, कॅरम हे

खेळही त्याला आवडतात. परंतु क्रिकेट हाच त्याचा सर्वात आवडीचा खेळ. त्यानेच त्याला बालपणापासून वेड लावले. त्यावेळी त्याच्या घराच्या आसपास खेळायला क्रीडांगणच उपलब्ध नव्हतं. त्याच्या वरळीच्या "सेक्रेड हार्ट" या शाळेजवळही क्रीडांगणाची सोय नव्हती. त्यामुळे अजितला आपले क्रिकेटचे प्राथमिक धडे घराशेजारच्या मोकळ्या जागेत घ्यावे लागले. त्यावेळी आपले बालमित्र जमवून तो टेनिसच्या चेंडूने खेळत असे. त्याच्या शाळेकडून क्रिकेटबाबत त्याला कसलंही प्रोत्साहन मिळालेलं नाही. पण अजितचं दैव शिकंदर होतं. तो राहातो त्या विभागात "वरळी स्पोर्टस् क्लब"ने स्वतःचे क्रीडांगण तयार करायचं ठरविलं. हे मैदान नाईक कुटुंबाच्या घरासमोरच आहे. अजितला खेळायला अन् मनसोक्त सराव करायला हक्काचे क्रीडांगण मिळाले.

## संधीचा क्षण साधून प्रगती

सुरूवातीला सराव करायला सौंगडीही मिळत नसत. पण अजितचा स्वभाव आहे जिद्दी आणि महत्त्वाकांक्षी. संकटाना तो थोडाच भीक घालणार ! त्याने एक यष्टी लावून स्वतः एकट्यानेच दररोज नियमाने तासन् तास..... गोलंदाजीचा सराव करायला सुरूवात केली. या वेळी त्याच्या आयुष्यात आणखी एक महत्त्वाची घटना घडली. "टाइम्स ऑफ् इंडिया" संघाचे सध्याचे कप्तान श्री. तोताराम शेषराव नायडू यांचे त्याला बहुमोल मार्गदर्शन लाभलं. श्री. नायडू हे नाईक कुटुंबाच्या शेजारीच राहातात. मध्यप्रदेश क्रिकेट संघातून रणजी करंडक स्पर्धेत ते पूर्वी खेळलेले आहेत. त्यांनी अजितला बहुमोल मार्गदर्शन केलं. गोलंदाजीतील आणि फलंदाजीतील विविध बारकावे शिकविले. त्यांच्या सतत सहवासाचा त्याला खूप उपयोग झाला. आपल्या घराशेजारीच असलेल्या वरळी स्पोर्टस क्लबच्या नव्या क्रीडांगणावर तो तासन् तास सराव करू लागला. आता सरावासाठी त्याच्याभोवती खूप सौंगडीही जमा झाले. त्यातून वरळी क्रिकेट क्लबमधील बाल क्रिकेटपटूंचा एक शाळकरी संघही तयार झाला. त्याचे कप्तानपद अर्थातच अजितकडे आले. पहिल्याच वर्षी (१९६४) या बाल संघाने डॉ. कांगा लीग स्पर्धेत भाग घ्यायचं ठरविलं. त्यावेळी या संघाला स्पर्धेसाठी लीगच्या "जी" विभागात प्रवेश देण्यात आला. पहिल्याच वेळी केलेल्या प्रगतीमुळं पुढील वर्षी या संघाला "एफ्" विभागात प्रवेश मिळाला. गतवर्षी तर अजितच्या या बाल संघाने प्रगतीचा कळस गाठला. कांगा लीगमध्ये "एफ्" विभागात पहिला क्रमांक मिळविण्याचा सन्मान मिळविला. तिन्ही वर्षी या संघाचा कर्णधार अजित हाच होता. त्याची आघाडीची गोलंदाजी, त्याची धडाडीची फलंदाजी आणि त्याचे कुशल नेतृत्व याचा संघाला नेहमीच फायदा झालेला आहे. संघाचा तो आधारस्तंभ आहे.

## कांगा लीगमुळे झालेला फायदा

अजितने पहिल्याच वर्षी कांगा लीगमध्ये केलेल्या पराक्रमामुळे त्याचे नांव शालेय विश्वात सर्वतोमुखी झाले. त्या वर्षी (१९६३–६४) मुंबईचा शालेय संघ सामन्यासाठी बडोद्याला जावयाचा होता. अजितच्या नावाची शिफारस झाली. त्याला चाचणीसाठी बोलावण्यातही आलं. परंतु त्याची निवड झाली नाही. त्यावेळी मुंबईच्या शालेय संघात कैलास गट्टानी, रमेश नागदेव, रामनाथ पारकर, एकनाथ सोलकर, किरण अधिकारी यांच्या सारखे नांवाजलेले क्रिकेटपटू निवडले गेले. पुढील वर्षी मुंबईचा शालेय संघ अहमदाबादला गेला. त्यावेळी मात्र अजितची निवड झाली. त्या वर्षी व पुढील वर्षी त्याने गोलंदाजी व फलंदाजी या दोन्ही बाबतीतहि खूपच प्रगती केली. त्या वर्षी "लंडन स्कूल्स संघ" आपल्या देशात आला होता. अजितला त्या संघाविरुद्ध खेळण्याची संधी मिळाली. गेल्या वर्षी अजितला मुंबई शालेय संघाचे उपकप्तानपद मिळालं. त्याने केलेल्या पराक्रमामुळं त्याला भारतातील सर्वोत्कृष्ट शालेय क्रिकेटपटू म्हणून निवडण्यात आले व त्याला जे. सी. मुकर्जी पारितोषिक देण्यात आले.

गेल्या वर्षी ऑस्ट्रेलियाचा शालेय संघ

## चौकाराची सीमा कशी ठरली ?



**पूर्वीच्या काळी चौकाराची सीमारेषा अशी काही ठरलेली नसे. फक्त लॉर्डसच्या क्रीडांगणावर चेंडू तंबूच्या कठड्याला लागल्यास चार धावा दिल्या जात होत्या. एरवी प्रत्येक फटक्याला पळूनच धावा काढाव्या लागत. अशा वेळी चेंडू जर प्रेक्षकांमध्ये शिरला तर त्याला व त्यामागे पळत असलेल्या क्षेत्ररक्षकाला झटपट जागा करून द्यावी लागे.**

**एकदा ए. एन्. हॉर्नबी नांवाचा लॅंकेशायर परगण्याचा, अत्यंत चपळ क्षेत्ररक्षक चेंडूमागे पळत असताना असाच जोराने गर्दीत घुसला. त्यामुळे सर्व प्रेक्षक विविध दिशांनी त्याला जागा देण्याकरता पळू लागले. त्या धांदलीमध्ये एका म्हाताऱ्या इसमाला वेळीच उठता न आल्यामुळे जबर दुखापत झाली. त्याला इस्पितळामध्ये नेण्यात आले. त्या प्रसंगाने एम. सी. सी. च्या सभासदांचे डोळे खाड्कन उघडले मग त्यानी सीमारेषेबद्दल काही निश्चित नियम केले.**

आपल्या देशात दौऱ्यावर आला. त्यावेळी एकूण पाच कसोटी सामने झाले. अजित पाचही सामन्यात खेळला. पहिल्या तीन सामन्यात कप्तान होता सुरिंदर अमरनाथ. शेवटच्या दोन सामन्यात अजितची कर्णधारपदी निवड झाली. याच सुमारास आणखी एक घडना घडली. अजित हॅरिस आणि गाइल्डशील्डमध्ये खेळलेला नव्हता. परंतु गोलंदाजी, फलंदाजी आणि नेतृत्व यात त्याने वेळोवेळी आपले नैपुण्य दाखवून दिलं होतं. बॉम्बे क्रिकेट असोसिएशनच्या निवड समितीचे लक्ष अर्थातच त्याच्याकडे होतं. त्यांनी त्याची चाचणी घेतली. आपल्या शालेय संघाचे उपकप्तानपद दिलं. त्याच सुमारास त्याने एके दिवशी सकाळीच वृत्तपत्रात बातमी वाचली की इंग्लंडच्या दौऱ्यावर जाणाऱ्या शालेय संघाचे कप्तानपदही त्यालाच देण्यात आलेलं आहे. त्याचा आनंद गगनात मावेना. त्याच्या अखंड तपस्येचे त्याला फळ मिळालं होतं. अजित इंग्लंडला जाणार होता आणि तोही भारतीय शालेय संघाचा कर्णधार म्हणूनच.

## पराक्रमी परंतु विनम्र !

"अजित, तुला गोलंदाजीची आवड निर्माण कशी झाली?" मी त्याच्याशी क्रिकेटविषयक चर्चा करीत असताना विचारलं. अजित हा इतर अनेक बाल क्रिकेटपटूप्रमाणे बडबड्या नाही. तो काहीसा अबोलच आहे. स्वत:बद्दल तर तो काहीच बोलेना. त्याच्या आई वडिलांकडून मला त्याची माहिती मिळवावी लागली. आणि योगायोग असा की त्याच वेळी त्याचे क्रिकेटमधील गुरु श्री. नायडू हेही आमच्या बैठकीत येऊन सामील झाले. गुरुंनी शिष्याची समजूत घातली. मीही आग्रह केला. त्यावेळी अजित अतिशय शांतपणे आणि विनम्रपणे उत्तरे देऊ लागला:

"मी गोलंदाजी बालपणापासून अगदी वयाच्या सहाव्या वर्षापासून करतोय. क्रिकेटची आवड मला लहानपणापासून आहे."

"पण तू आघाडीच्या गोलंदाजीकडे कसा वळलास? अलिकडे लहान मुलांना जलदगती गोलंदाजीपेक्षा मंदगती गोलंदाजीचे आकर्षण वाटते. नाही?" मी त्याला बोलका करण्यासाठी म्हणालो.

"बालपणापासून मी आघाडीचा गोलंदाज आहे. मंदगती, फसवी गोलंदाजीही मी टाकू शकतो."

"तुझ्यापुढे आदर्श गोलंदाज म्हणून कोण होते?"

"मी कुणाचंही अनुकरण केलेलं नाही. माझी शैली ही खास माझी स्वत:ची आहे. कारण मी गेल्या वर्षापर्यंत कोणताही कसोटी सामना पाहिलेला नाही. फक्त रेडिओवरील कॉमेंटरी मात्र दिवसभर ऐकत असे."

"फलंदाजीत तू कोणत्या क्रमांकाला खेळतोस? आणि क्षेत्ररक्षणाची तुझी आवडती जागा कोणती?"

"सामन्यत: मी सहाव्या सातव्या क्रमांकाला फलंदाजीस जातो. क्षेत्ररक्ष-

णाची माझी ठराविक जागा नाही. मी कुठंही क्षेत्ररक्षण करू शकतो. इंग्लंडमध्ये मी बहुतेक जागी क्षेत्ररक्षण केलं आहे."

## विजयाचे श्रेय सांघिक वृत्तीला

"आता आपण इंग्लंडच्या दौऱ्याकडे वळूया. या दौऱ्यात तुझ्या संघाने परदेशात जाऊन भारताची प्रतिष्ठा वाढविली. तुम्ही सर्व खेळाडू सांघिक भावनेनं खेळलात. या अपूर्व यशाचे प्रमुख शिल्पकार कोण?" मी विचारले. माझ्या प्रश्नाचा खूप विचार करीत शांतपणे तो म्हणाला,

"या दौऱ्यातील यशाचे सारे श्रेय सर्व खेळाडूंचे. हे सांघिक यश होतं. एकट्या-दुकट्या व्यक्तीचे नाहीं. पण प्रमुख शिल्पकार म्हणून आमचे व्यवस्थापक ले. क. हेमू अधिकारी हेच आहेत. त्यांचा क्रिकेटमधील प्रदीर्घ अनुभव, त्यांची शिस्त आणि बहुमोल मार्गदर्शन यामुळंच आमच्या संघाला विजयश्रीने माळ घातली. हा दौरा अपेक्षेपेक्षा खूप यशस्वी झाला."

"मला कल्पना आहे त्याची. दौरा सुरू होण्यापूर्वी अधिकारी यांच्या मार्गदर्शनाखाली एक चौदा दिवसाचा दिल्ली येथे कॅंप ठेवण्यात आला होता. त्या कॅंपमध्ये तुम्ही मुलांनी काय काय केलेत ते सांगाना... त्याचा फायदा झाला ना?" मी म्हणालो.

"होय तर. त्या कॅंपमुळेच आम्ही सर्व खेळाडू एकत्र आलो. नाना प्रांतातले नाना भाषा बोलणारे आम्ही खेळाडू! परस्परांशी चांगला परिचय झाला. मैत्री झाली. आणि त्या कॅंपमध्ये सतत चौदा दिवस आम्हाला खूप सराव झाला. तेथे आम्हाला दररोज पाच सहा तास सराव करावा लागे. गोलंदाजी, फलंदाजी, क्षेत्ररक्षण सक्तीने करावे लागे. शिवाय तो कॅंप होता पावसाळ्यात. त्यामुळे ओलसर खेळपट्टीवर खेळायची सवय झाली. इंग्लंडमध्ये सर्वांच्या तब्येती चांगल्या राहिल्या. सर्व 'फिट्' होते त्याचे कारण हा कॅंपच."

## ओलं आणि सुकं क्रिकेट

"आता खेळपट्टूचांचा संदर्भ आला म्हणून विचारतो. आपल्या देशातील खेळपट्टया आणि इंग्लंडमधील खेळपट्टया—यात तुला कोणता फरक दिसला?" मी उत्सुकतेने विचारलं.

"त्याचं असं आहे—" अजित सांगू लागला. "इंग्लंडमध्ये सतत पाऊस पडतो. खूप थंडी असते. खेळपट्टया ओलसर असतात. त्यामुळे चेंडू वळविता येतो. केवळ नवाच चेंडू नव्हे तर जुना चेंडूही वळविता येतो. दिवसभर गोलंदाजी करूनही गोलंदाज दमत नाही. त्याच्या उलट आपल्याकडच्या खेळपट्टया गोलंदाजी करायला अवघड. दमायला लवकर होतं. आपल्या खेळपट्टया फलंदाजांना जास्त अनुकूल असतात."

"इंग्लंडमध्ये पाऊस असतो. ह्या पावसाने तुम्हाला कितपत त्रास दिला?"

"आमचा संघ इंग्लंडमध्ये पावसाळ्याच्या उत्तरार्धात गेला. हा मोसम आम्हाला खेळण्याच्या दृष्टीने चांगला मिळाला. केवळ एकच सामना पावसामुळे झाला नाही."

"इंग्लंडमध्ये त्यांच्या शालेय संघाचा दोन्ही कसोटी सामन्यात पराभव झाला. तुझ्या दृष्टीने त्यांच्या संघात कोणत्या उणीवा होत्या?"

"इंग्लिश संघ क्षेत्ररक्षण, गोलंदाजीत, विशेषतः द्रुतगती गोलंदाजीत, आपल्यापेक्षा वरचढ होता. त्यांच्या प्रत्येक साध्या सामन्यातही किमान तीन द्रुतगती गोलंदाज असत. क्षेत्ररक्षणातही तो संघ आपल्यापेक्षा वरचढ होता. परंतु त्यांचे फलंदाज हे 'बॅकफूट'ने खेळणारे. त्यांना आपली फिरकी गोलंदाजी (सरकार—जसबिर सिंग यांची) तितक्या प्रभुत्वाने खेळता आली नाही. शिवाय आपले सर्वच खेळाडू जिद्दीने खेळले. सांघिक भावनेने खेळले. त्यामुळे आपल्याला विजय मिळाले."

"या दौऱ्यात अधिकारीशिवाय आणखी कोणा परकीय श्रेष्ठ क्रिकेटपटूंचे मार्गदर्शन किंवा उत्तेजन तुला लाभले काय?"

## कीथ मिलरचे मार्गदर्शन

"आम्ही सराव करीत होतो. त्यावेळी सुप्रसिद्ध ऑस्ट्रेलियन क्रिकेटपटू कीथ मिलर हे तेथे आले. त्यानी माझी गोलंदाजी पाहून समाधान व्यक्त केले. काही बहुमोल सूचना दिल्या. त्यानी माझ्या पाठीवर मारलेली शाबासकीची थाप आणि त्यानी मी इकडे आल्यावर पाठविलेले हे पत्र ह्या माझ्या जीवनातील अविस्मरणीय घटना आहेत."

अजितने मिलरचे पत्र मला दाखविले. मिलरने त्याच्या गोलंदाजीबद्दल समाधान व्यक्त केले असून हा मुलगा भावी काळात भारताच्या कसोटी सामन्यातील आघाडीचा गोलंदाज होईल असे भाकित वर्तविले आहे.

"तुझ्या दृष्टीने इंग्लंडच्या या दौऱ्याचा भारतीय क्रिकेटच्या दृष्टीने कोणता फायदा होईल?"

"आम्हा शाळकरी मुलांना इंग्लंडमध्ये खेळण्याचा अनुभव मिळाला हे माझ्या दृष्टीने फार महत्वाचे आहे. त्यातून भारताचा भावी संघ निर्माण होईल. या अनुभवाचा फायदा मोठेपणी आम्हाला नक्कीच मिळेल."

"तू क्रिकेटविषयक पुस्तके वाचतोस काय?" मी विचारले.

"वाचनाचा नाद मला बालपणापासून आहे. रणजी, ब्रॅडमन, दुलीप सिंहजी, ट्रेव्हर बेली प्रभृतींची पुस्तके वाचली आहेत मी."

मी त्याचा निरोप घेताना म्हणालो, "क्रिकेटचा आणि त्यातही द्रुतगती गोलंदाजीचा सराव सोडू नको. मिलरने सांगितले आहे ते लक्षात ठेव. माझी खात्री आहे की चार पाच वर्षांनी भारतीय संघाचा आघाडीचा गोलंदाज म्हणून तुझी निवड झाल्याशिवाय राहाणार नाही." •••

अनुक्रमणिका








# ललितकलादर्श

## मराठी मन जिंकणारे तीन पिढ्यांचे एक नाट्य-भूषण

—प्रभाकर नारायण वेलणकर



**नटश्रेष्ठ केशवराव भोसले–पहिली पिढी**

**'ललितकलादर्श'**ला आता आठ वर्षे पूर्ण होत आहेत, हे पाहून प्रत्येक मराठी माणसाला आनंद वाटेल. कारण ही संस्था सर्व महाराष्ट्राची आहे. जशी 'केसरी' संस्था महाराष्ट्राची, 'भारत इतिहास संशोधक मंडळ' महाराष्ट्राचे, कर्मवीर भाऊराव पाटलांची 'रयत शिक्षण संस्था' महाराष्ट्राची, तशीच ललितकलादर्श नाटक मंडळीही महाराष्ट्राची आहे. याचे कारण असे की महाराष्ट्राच्या सुखदु:खांशी ही संस्था सदैव एकरूप झालेली आहे. संयुक्त महाराष्ट्रासाठी आन्दोलन असो, गोव्याचा प्रश्न असो, किंवा करमणूक कर उठविण्याचा प्रश्न असो, या संस्थेच्या मालकानी त्यात जिव्हाळ्याने लक्ष घातलेले आहे. रंगमंचाच्या कक्षेतील सर्व साधनांनिशी वरील आंदोलनाचा पुरस्कार केला आहे. याचे अगदी उत्तम उदाहरण म्हणजे 'ललितकले'च्या "जय-जय गौरी शंकर" नाटकातील गोमांतक आणि महाराष्ट्राच्या एकरूपतेचा बेमालूम प्रचार! करमणूक कराविरुद्ध भालचंद्र पेंढारकरांनी केलेला तुफानी प्रचार सर्वांच्या स्मरणात असेलच, आणि म्हणूनच "खास लोकाश्रयाखाली" ही 'ललितकले'ची बिरुदावली तिच्या मस्तकावर राज मुकुटाप्रमाणे दिमाखाने शोभते. मराठी जनतेनेही आपला उदार आश्रय सतत साठ वर्षे या मंडळीना देऊन लोकमान्यतेच्या हीरक शिरपेचाचा तिला आहेर केला आहे.

'ललितकलादर्श'चा इतिहास म्हणजे तीन पिढ्यांचा इतिहास. कुशल अभिनेत्यांच्या तीन पिढ्या आणि जाणकार प्रेक्षकांच्या तीन पिढ्या. ही परंपरा मोठी जिव्हाळ्याची आहे, मराठी रंगभूमीवर अभूतपूर्व आहे. विष्णूदास भाव्यांनी मराठी रंगदेवतेची प्राणप्रतिष्ठा केल्यानंतर अण्णासाहेब किर्लोस्करांनी तिची नयनमनोहर पूजा बांधली आणि गाभाऱ्यात केशवराव भोसल्यानी 'ललितकले'चा हा आखंड नंदादीप लावून ठेवला. तेव्हापासून आज अखंड साठ वर्षे तो तेवत आहे याचा साऱ्या महाराष्ट्राला अभिमान वाटतो, यात नवल ते काय?

'ललितकलादर्श' ही केवळ एक धनैकदृष्टी नाटक मंडळी कधीच नव्हती आणि आजही नाही. तशी जर ती असती तर ठराविक वेळीच–ठरलेल्या ठोक्यालाच उद धुपांचे उग्रमधुर धूम्रछत प्रेक्षागृहात पसरले पाहिजे, प्रेरक घंटेचा निनाद त्याच वेळी घणघणला पाहिजे, आणि नांदीच्या सुरावटीत मखमलीचा पडदा मोठ्या झोकात गजगतीने अन्तर्धान पावला पाहिजे, हा अट्टाहास 'ललितकलादर्श'ने कां धरला असता? अगदी धार्मिक कडवेपणाने वेळेचे परिपालन 'ललितकले'च्या तिन्ही पिढ्यांचे तिन्ही धनी कां करीत आले आहेत? केशवराव, बापूरावाप्रमाणेच आज भालचंद्रही ही कुलरीत पाळण्यासाठी जीव पाखडत असतात. हे तिघेही इतके ध्येयवेडे कां? लोकांचे केवळ मनोरंजन करायचे सोडून हा अट्टाहास कसला? धनिक वणिक बाळांची तरी पर्वा करायची, राजा महाराजाना तरी मोजायचे, मंत्र्यांना आणि



अनुक्रमणिका






दादांना तरी दाद द्यायची—पण छे :! वेळेच्या वेडापुढे कुणाचाच मुलाहिजा नाही. जी वेळ जनताजनार्दनाला दिली, तीच राजा महाराजांनी मानली पाहिजे. तीच मंत्र्यांनी आणि दादांनी स्मरणपूर्वक पाळली पाहिजे. धनिकानीही तेच बंधन स्वीकारले पाहिजे. आणि वणिकांनीही त्याच निर्बंधाला 'मम' म्हटले पाहिजे. असा हा विलक्षण हट्ट केशवरावांनी तो सुरू केला, बापूरावांनी चालू ठेवला आणि भालचंद्र तो चालवित असतात. कारण या तिघांपैकी कोणालाच केवळ लोकानुरंजन हे 'ललितकले'चे ध्येय वाटलेले नाही. केवळ लोकानुरंजनापेक्षाही लोक शिक्षणाला अर्थात सार्वजनिक चारित्र्याच्या जडण-घडणीलाच त्यांनी अधिक महत्व दिलेले आहे आणि म्हणूनच महाराष्ट्राला ही संस्था आपली वाटते.

राष्ट्रीय निकडीच्या वेळेलासुद्धा 'ललितकलेनं' राष्ट्रीय नेत्यांच्या हाकेला ओ दिली आहे. लोकमान्यांच्या निधनानंतर त्यांच्या स्मरणाप्रीत्यर्थ टिळक-स्वराज्यफंड महात्मा गांधींनी सुरू केला

भालचंद्रपंत पेंढारकर–विद्यमान पिढी





नटवर्य बापूराव पेंढारकर–दुसरी पिढी

आणि धनराशींसाठी राष्ट्राला आवाहन केले. केशवराव भोसल्यानी या निधीसाठी आपल्या 'ललितकले'च्या सर्व शक्तीनिशी गंधर्वमंडळीच्या हातात हात घालून 'मानापमाना'चा संयुक्त प्रयोग केला. हा प्रयोग मराठी रंगभूमीच्या इतिहासातील सोन्याचे पान ठरला. ज्यांनी तो पाहिला त्यांनी आपले जीवित धन्य मानले. त्या दिवशीच्या ऊदधुपाचा परिमल आजही महाराष्ट्राच्या स्मृतीत दरवळतो आहे. त्या रात्री केशव–नारायणांनी साडेसोळा सहस्र रुपये लोकमान्यांच्या स्मृतीला वाहिले. त्या संयुक्त प्रयोगात केशवरावांनी आपल्या तेजस्वी गायनाभिनयाचं पूर्णत्वानं प्रकटीकरण तर केलेच, पण आपला ऋजु, उमदा आणि सुसंस्कृत स्वभावही त्या दिवशी प्रकट केला. त्यांनी बाल गंधर्वांना वनमालेच्या भूमिकेतसुद्धा आपले जोडे न उचलण्याचा परोपरीने आग्रह केला. दुसऱ्यांच्या भावनांना जपण्याची केवढी ही थोर मनोभूमिका! बालगंधर्वही तितकेच थोर. त्यांनी स्पष्टच सांगितले की इथे मी वनमाला-भामिनी आहे आणि तुम्ही धैर्यधर आहात. दोघेही असे होते, म्हणूनच महाराष्ट्राला चटका लावून गेले. म्हणूनच महाराष्ट्राने त्यांना आपले मानले.

दुसरा संयुक्त प्रयोग 'सौभद्रा'चा झाला. रसिकांनी नऊ सहस्र रुपये केवळ केशव-नारायणांचे पुढे ओतले. केशवरावांच्या डोळ्यात सात्विक पाणी चमकू लागले. तो भोसले कुलोत्पन्न धैर्यधर बाल गंधर्वांना म्हणाला–"नारायणराव, तुम्ही काही काळजी करू नका. आपण असेच अनेक संयुक्त प्रयोग लावू, तुमचे कर्ज हां हां म्हणता फिटून जाईल." दुसऱ्यांच्या क्लेशांबद्दल अशी सहानुभूति आता कोठे दिसेल? प्रतिस्पर्ध्याबद्दल सुद्धा असं निरागस प्रेम आता कोठे दिसेल? "सर्वे सुखिनः सन्तुः, सर्वे सन्तु निरामयाः" या प्रवृत्तीचा परिपोष केशवरावांमध्ये पूर्णतया झाला होता.

भोसले हे कुलनाम आता महाराष्ट्रात केवळ एक आडनांव राहिलेले नाही. शौर्य, धैर्य, स्वातंत्र्यप्रेम, स्वधर्म–प्रेम, चाणक्यवृत्ती अन् हौतात्म्य, यांचे ते येथे प्रतीक मानले जाते. केशवरावांना आपल्या भोसलेपणाचा अभिमान होता, आपल्या परंपरेचा अभिमान होता. बाणेदारपणाचे त्यांना बाळकडू मिळाले होते. कोल्हापूरकर शाहू महाराजांची मर्जी त्यांनी सांभाळली असती तर केशवरावांना आयुष्यभर कशाची ददात पडली असती ? परंतु आत्मस्वातंत्र्यासाठी त्यांनी महाराजांनाही दुखावले. शाहूमहाराजही

अनुक्रमणिका







उदारचरित. त्यांना गुणांची कदर. म्हणूनच केशवरावांच्या मृत्युशय्येपाशी पुण्यात एका जुन्या वाड्यातसुद्धा "केशव, केशव" करीत ते उपस्थित झाले. अशी ही एक एक उज्ज्वल आणि उदात्त दृष्ये दृष्टीपुढून हालत नाहीत.

जिवंतपणी केशवरावांनी अनेक भूमिका बहारीच्या केल्या. आपला जीव त्यात ओतून त्या जिवंत केल्या. "मूर्तिमंत भीति उभी" म्हणताना हरणाच्या गोजीरवाण्या पाडसाप्रमाणे किंवा श्रावणातल्या कातरकोवळ्या उन्हाप्रमाणे भयचकीत दिसणारी त्यांची शारदा, जुन्या रसिकांच्या स्मृतीसमोर आजही उभी आहे. त्यांची मृणालिनी, त्यांचा डेव्हिड, त्यांचा धैर्यधर, त्यांचा शिवाजी, त्यांचे ते तेजस्वी गायन हे सर्व आजही जातिकुसुमांनी सुगंधित झालेल्या शेल्याप्रमाणे मखमालीच्या पडद्यातून दरवळत आहे. परंतु मृत्यूनंतर जी भूमिका त्यांनी वठविली तिने केशवरावांना महाराष्ट्राच्या हृदयात अढळ स्थान मिळवून दिले. ही होती केशवराव भोसले यांची स्वतःचीच भूमिका. या भूमिकेत 'ललितकले'च्या स्वामित्वाची वस्त्रे त्यांनी पेंढारकर-चापेकरांच्या अंगावर चढवली. या भूमिकेत "गुणाः पूजास्थानम्"चा बाणा बाळगणारे केशवराव सर्वांना दिसले. जसे ते जन्मभर होते, तसेच ते मृत्यूनंतरही दिसले. त्यांच्या अभिनयात नेहमी सच्चेपणा होता पण सच्चेपणात अभिनय मात्र कधीही नव्हता. म्हणूनच आजच्या पोषाखी युगात केशवराव आगळे वेगळे राजहंस वाटतात.

केशवयुगानंतर 'ललितकले'त पेंढारकरयुग आले. पेंढारकर म्हणजे तपस्या. पेंढारकर म्हणजे पुरुषार्थ. रूप, रंग, कंठमाधुर्य यासंबंधात निसर्गाने त्यांच्याशी असहकार पुकारलेला. परंतु पुरुष प्रयत्नाने आणि अभिनयाच्या सामर्थ्याने त्यांनी या त्रुटींवर मात केली. केशवरावांचा प्रेक्षक आणि श्रोता त्यांनी आपल्याकडे खेचून आणला. 'ललितकलादर्श'ची महाराष्ट्रावरील पकड त्यांनी अबाधित ठेवली. बापूराव म्हणजे मराठी रंगभूमीवरील एक अजब चमत्कार होऊन गेले. गणपतराव जोशांसारखा धिप्पाड देह अन् दणदणीत आवाज नाही. भाऊराव कोल्हटकरांसारखे मनमोहक रूप नाही. बाल गंधर्वांसारखे स्वर्गीय कंठमाधुर्य नाही. अशा स्थितीत मराठी रसिकांवर त्यांनी हुकुमत गाजविली. हा एक विलक्षण चमत्कारच नव्हे काय? किती तरी भूमिकांवर बापूरावांचीच मुद्रा अंकित झालेली आहे. 'कृष्णार्जुन युद्धात'ला मिष्किल नारद, सत्तेच्या गुलामातील वैकुंठ, 'सोन्याचा कळस'मधील विठूकृष्णा, 'श्री'मधील श्रीकांत या केवळ त्यांच्याच भूमिका आहेत. इतर कुणीही या भूमिका केल्या तरी बापूरावांच्या कित्त्यावर-हुकूमच त्या करायला हव्यात. इतक्या त्या बापूरावांशी एकरूप झालेल्या आहेत. आपल्या आवाजाला अनेक मर्यादा असूनही केवळ बुद्धिचातुर्य आणि कठोर साधना यांच्या बळावर त्यांनी त्याला अशी काही विलक्षण झार आणली की श्रोत्यांनी केशवरावांच्या तेजस्वी गायनाचा हाच एकमेव वारस म्हणून संतोषाने टाळी दिली.

बापूराव केवळ रंगभूमीवरचेच मात्र एक साधक नव्हते. त्याच्याही आधीपासून ते पारमार्थिक मार्गातील एक साधक होते. लहानपणीच त्यांना गुरुगृही निवास लाभला होता. त्यांचे गुरु महान् योगी होते आणि त्यांचेकडून बापूरावांना साधनामार्गही प्राप्त झाला होता. अशा महापुरुषांच्या कृपादृष्टीमुळेच बापूराव रंगभूमीच्या मोहमय संसारात निर्मोही राहिले.

बापूराव प्रवृत्तिमार्गी, अध्यात्मवादी होते. निवृत्तिमार्गी नव्हे. म्हणूनच ते नीरस नव्हते. त्यांना मुंबईचे भारी वेड होते. क्रिकेट कॅरममध्ये ते रमले, हारमोनियममध्ये त्यांनी कसब कमावले, अभिनयात प्राण ओतला, स्वतःचे गायन एक अजब मधुर रसायन बनविले, मराठी रंगभूमीला आधुनिक रूप दिले, नव्या नव्या यांत्रिक, आणि तांत्रिक प्रयोगांवर कर्णाच्या दानतीने द्रव्य वेचले. मोटारचा बेहद्द शोक केला. एकंदरीत प्रवृत्ति मार्गाचा हा पाईक जीवनात पूर्णपणे रंगला होता. 'ललितकलादर्श'ची प्रत्येक निर्मिती ही भव्य, उदात्त, नाविन्यपूर्ण, आकर्षक आणि श्रीमंत असली पाहिजे अशी त्यांची जिद्द असे. रंगभूमीला सजविण्यासाठी सर्वप्रथम त्यांनीच चित्रपट राबवला. असा कल्पक, असा जिद्दी, असा नाविन्याचा भोक्ता नट-निर्माता दुसरा झाला नाही.

आज 'ललितकलादर्श'ची सूत्रे बापूरावांचे सुपुत्र श्री. भालचंद्र पेंढारकर यांचे हाती आहेत. ही सांधेजोड इतकी बेमालूम झालेली आहे की भालचंद्र म्हणजेच बापूराव वाटावेत, इतके सादृश्य त्या दोघात आहे. भालचंद्रानी १९४२ साली 'सत्तेचे गुलाम' लावून वैकुंठाच्या भूमिकेत रंगभूमीवर अधिकृतरित्या पदार्पण केले. त्यावेळी प्रेक्षकांना आश्चर्याचा एक गोड धक्का बसला. त्या वैकुंठाला पाहून प्रेक्षक आपसात कुजबुजू लागले की, 'बापूरावच वैकुंठातून परत रंगभूमीवर आले की काय? तोच आवाज, तेच रूप, अभिनयाचा तोच डौल, तेच गाणे हे सर्व इतके एक कसे?" भालचंद्रांच्या रूपाने बापूरावांचे हे पुनरागमन पाहून 'ललितकले'च्या चाहत्यांना अस्मान ठेंगणे झाले. भालचंद्रांचे सर्वत्र प्रेमपूर्वक स्वागत झाले. भालचंद्र आपल्या वडिलांनी गाजविलेल्या सर्वच भूमिका हुबेहूब तशाच उभ्या करतात. रामकृष्णबुवा वझे यांनी भालचंद्रांकडून संगीतसाधनाही प्रेमाने आणि कौतुकाने करवून घेतली त्यामुळे 'ललितकले'च्या गाण्याचेही ते वारस झाले आहेत. अभिनय आणि गायन यावरील प्रभुत्वामुळे ते आज मराठी रंगभूमीवरील एक सव्यासाची अभिनेते आहेत.

एक घडाडीचे कुशल निर्माते म्हणूनही महाराष्ट्र भालचंद्रांना ओळखतो. त्यांची प्रत्येक निर्मिती ही 'ललितकलादर्श'च्या परंपरेला साजेल अशीच शिस्तबद्ध,

शिक्षणपूर्ण आणि शिकस्तीची असते. भव्य, दिव्य, वास्तववादी आणि चित्ताकर्षक नेपथ्यरचना हे ललितकलेचे वैशिष्टय आहे. त्यामुळे "पडद्याला टाळी" हा वाक्प्रचार बुजुर्ग पत्रपंडितांनी भालचंद्रांच्या राज्यात रूढ केला. भव्यतेचे भालचंद्रांना विलक्षण वेड आहे. वास्तवतेच्या कक्षा सांभाळून प्रत्येक दृश्य शक्य तितिके नेत्रदीपक असावे, असा त्यांचा कटाक्ष असतो. त्यासाठी सर्व तऱ्हेचे यांत्रिक आणि तांत्रिक ज्ञान ते राबवतील. धनाची तमा बाळगणार नाहीत. याची साक्ष पंडितराज जगन्नाथ, आकाशगंगा, गौरीशंकर या नाटकांची नेपथ्य सजावटच देऊ शकेल. दिल्लीस 'आकाशगंगा' नाटकात प्रत्यक्ष फिरत्या ढगांची फिल्म वापरून त्यांनी असे काही अद्‌भूत वातावरण उत्पन्न केले की प्रेक्षकांना प्रत्यक्ष अंतराळातच आपण आहोत, असा भास होऊ लागला. तोच प्रकार दिल्लीला 'स्वामिनी'च्या प्रयोगाच्या वेळी. यांत्रिक सहाय्याने विजांचा लखलखाट आणि ढगांचा गडगडाट त्यांनी उत्पन्न केला. त्यामुळे त्या नाटकातील जगन्नाथ-काशी यांचा पर्जन्यातील प्रणय-प्रसंग असा बहारीचा रंगला की विचारू नका.

यंत्र आणि तंत्र याबरोबरच नाटकात मंत्रही निश्चित असायला हवा, अशी भालचंद्रांची श्रद्धा आहे. हेतुप्रधान नाटक असले म्हणजेच नटांना आपला अभिनय कसाला लावून कर्तबगारी दाखविता येते, या सिद्धान्तावर त्यांचा विश्वास आहे. एरवी 'न-नाटचात' काय सर्वच आनंद असतो. नाविन्य आणि प्रयोगशीलता यांचे तर भालचंद्रांना बाळकडूच मिळाले आहे. परंतु भंकस नवनाटककार, त्यांच्या तिरकस अनुभूति, त्यांची प्रतीकशरणता, या सर्व स्तोमाना ते झटकून टाकतात, त्यांना आपल्या जवळपास देखील फटकू देत नाहीत. त्यामुळे केशवरावांची अन् बापूरावांची 'ललितकलादर्श' आज दिमाखाने रसिकांच्या पुढे उभी आहे.

नव्या दमाच्या प्रतिभासंपन्न नाटककारांची नाटके भालचंद्रांनी आपल्या रंगभूमीवर आणली आणि त्यांचे शेकडो प्रयोग केले. त्यांना आपल्या नाटककारांचा पूर्ण अभिमान आहे. श्री. पु. भा. भावे यांचे 'स्वामिनी' नाटक त्यांनी घेतले, आणि दृष्ट लागण्यासारखे उभे केले. त्याचे प्रयोग विलक्षण रंगू लागले, त्यातील खोचक संवादांनी विद्ध झालेल्या आधुनिकांनी नाटका विरुद्ध एकच काहूर माजविला. वर्तमानपत्रात वाद झडू लागले. नाटकावर अनुकूल प्रतिकूल परीक्षण यऊ लागली, ठिकठिकाणी वादविवाद सभा रंगू लागल्या. काही टीकाकारांनी या नाटकास केवळ एक फार्स मात्र ठरविले. काही उच्चभ्रूनी हे नाटक नेहमीप्रमाणेच प्रतिगामी ठरविले, काहीनी "हा घ्या भाव्यांच्या 'स्त्रीद्वेषाचा' जिवंत पुरावा." म्हणून बोटे दाखविली आणि मोडली. काहीना शोव

[पृष्ठ ५८ वर पहा]










# क्रिकेटची पंढरी ऑस्ट्रेलिया

—रंगा सोहोनी

वीस वर्षानंतर भारतीय क्रिकेटपटू पुन्हा ऑस्ट्रेलियन मैदानावर उतरले आहेत. या कालावधीत भारतीय क्रिकेट बदलले की नाही याचे उत्तर लवकरच मिळेल. ह्याच-साठी हा लेख मुद्दाम प्रसिद्ध करीत आहोत....



**झाले बहु, होतील बहु, परंतु या सम हाच–डॉन ब्रॅडमन**

**१९४६** साली भारताच्या टीममधून इंग्लंडच्या दौऱ्यावर जाण्याची संधी मला प्रथमच मिळाली होती. तो दौरा संपवून १९४६ च्या ऑक्टोबर महिन्यात बोटीने आम्ही भारतात परत येत होतो. त्यानंतरचा दौरा ऑस्ट्रेलियाचा. मी व फडकर ह्यांची आघाडीचे गोलंदाज म्हणून त्यासाठी निवड झाली.

सर्व टीम एकाच विमानातून जाणार होती. टीमचे मॅनेजर गुप्ता. प्रिन्स दुलीपसिंहजी एका खास वर्तमानपत्रासाठी बातमीदार म्हणून सबंध दौरा करणार होते. तेहि आमच्याच विमानात बसले. अमरनाथ हा संघनायक असून रांगणेकर, सी. एस्. नायडू, हजारे, किशनचंद, मनकड, अधिकारी, अमीर इलाहि यांचीहि निवड झाली होती. हिंदुस्थानातून क्रीडाक्षेत्रातील हा भारतीयांचा ऑस्ट्रेलियाला जाणारा पहिलाच संघ होता. त्या दृष्टीने त्याचे खूप कौतुक होणार हे उघड होते.

## पावसाने दिलेली सलामी

आमची पहिली मॅच सतरा ऑक्टोबरला वेस्टर्न ऑस्ट्रेलिया-बरोबर होती. पण पावसामुळे ती मॅच अनिर्णीतच राहिली. त्या सामन्यात कोणाचा 'फार्म' वगैरे दिसण्यास संधीच मिळाली नाही. ऑस्ट्रेलियात एकंदर हवा हिंदुस्थानसारखीच असते असे ऐकले होते. पण यावेळची थंडी पाहिल्यावर पुन्हा इंग्लंडची आठवण झाली. कोणीहि गरम कपडे विशेषतः ओव्हरकोट आणले नव्हते. पहिली मुख्य खरेदी करावी लागली आणि ती म्हणजे गरम कोटांची. या गरम कोटांवरच दुसऱ्या दिवशी वर्तमानपत्रात जिकडे तिकडे गवगवा झाला. कोट विकत घेत असतानाचे एक दोघांचे फोटोहि छापून आले. संध्याकाळी सर्व खेळाडू शेगडीजवळ कसे शेकत बसतात असाहि फोटो येऊन गेला. टीमच्या सर्व हालचालींवर त्यांचे लक्ष. पहिल्या दिवशी तर एक दोघे कॅमेरा घेऊन थेट हॉटेलच्या खोलीत शिरले. त्यांना कपडे बदलत असतानाचा फोटो हवा होता। म्हणे. आहे की नाही क्रिकेट-बद्दल वेडे प्रेम?

रात्री जेवणानंतर त्यावेळचा जागतिक अमॅचुअर बिलियर्ड चॅम्पियन बॉब मार्शलचा खेळ पाहाण्यास आम्ही काही जण गेलो. पठ्ठयाने पहिलाच ब्रेक तीनशे तीनचा केला! फारच छान खेळला. अन् त्याचे अभिनंदन केले तर म्हणतो कसा–"मी तर काहीच नाही. तुम्हाला अजून ब्रॅडमन भेटायचाय." डार्विन विमानतळावर एका धिप्पाड गृहस्थाने हेमू अधिकारीला किशनचंदकडे बोट दाखवून विचारलेच की– "How would you face our Lindwall" (तुम्ही आमच्या लिंडवॉलला कसे तोंड देणार?) "Who will take Don out?" (डॉनची विकेट कोण घेणार?)

## ब्रॅडमन भेटल्याची धन्यता

पर्थहून ॲडिलेड जवळ जवळ बाराशे मैल दूर आहे. आमचा प्रवास विमानाने न थांबता झाला. विमान पहाटेला ॲडलेडला आले. तिथे ब्रॅडमन मुद्दाम टीमला भेटण्यास येणार होता. ही बातमी



अनुक्रमणिका








पंकज गुप्तान (व्यवस्थापक) आम्हाला विमानात सांगितली. प्रत्येकाला आतापर्यंत ब्रॅडमनविषयी, त्याच्या खेळाविषयी व त्याच्या टेस्ट रेकॉर्डस्‌विषयी खूप ऐकायला व वाचायला मिळाले होते. माझा आनंद तर अगदी गगनात मावेना. अगदी लहानपणी शाळेत खेळताना ब्रॅडमनच्या मोठ मोठ्या धावांचे डोंगर मी मोठ्यांच्या तोंडून ऐकले होते. अन्‌ आता थोड्याच तासानंतर खुद्द त्याचे दर्शन मिळणार होते ! व त्याच्याशी एक दोन शब्द बोलण्याची सुवर्णसंधीहि मिळणार होती. विमानातून उतरताना काही जाड जाड गरम कोट घातलेली माणसे आमच्याकडे चालत येताना दिसली. त्यात ब्रॅडमनहि होता. प्रथम सर्वांची ओळख व्हावी म्हणून आम्ही सर्व एका ओळीत उभे राहिलो. ब्रॅडमन हसऱ्या चेहेऱ्याने व लबाड डोळ्यानी प्रत्येकाशी थोडे थोडे बोलत हस्तांदोलन करीत होता. लाला अमरनाथने नेहमीच्या रिवाजाप्रमाणे इतरांप्रमाणे माझीहि त्याच्याशी ओळख करून दिली. त्याच्याशी हस्तांदोलन करताना मला माझी महत्वाकांक्षा सफल झाल्यासारखे वाटत होते. ज्या माणसाकडे त्याच्या क्रिकेट-मधील पराक्रमामुळे जगातील हजारो लोकांचे लक्ष लागले होते, ज्या माणसाविषयी हजारोना कुतुहल व प्रेम वाटत होते, ज्याच्या मर्दुमकीबद्दल हजारो लेखकांनी कुशल लेखणीने गुणवर्णने करण्याचा प्रयत्न केला होता त्या ब्रॅडमनला भेटण्याची संधी मिळून त्याच्याशी दोन शब्द बोलण्यास मला मिळाले म्हणून मला त्यावेळी नुस-ताच अभिमान नव्हे तर थोडा गर्वहि वाटला. तो दिसण्यात लहान म्हणजे उंचीला पाच फूट चार इंच पण शरीर प्रकृतीने अगदी मजबूत होता. त्याच्या पराक्रमाची अपूर्व शक्ती त्याच्याशी हस्तांदोलन करताना त्याच्या स्पर्शातून जाणवत होती व त्याच्या गुणांचे तेज त्याच्या डोळ्यात प्रत्यक्ष दिसत होते.

या अॅडलेडच्या सामन्यात ब्रॅडमनने आम्हाला हैराण केले. तो इतका तडफदार खेळला की त्याच्या टोलेबाजीचे वर्णन करता येणार नाही. लागोपाठ चार पाच चौकार मारण्यात तर तो पटा-ईतच आहे. पहिल्या दहा वीस धांवा करीपर्यंत तो खूप धीमे-पणाने खेळतो. प्रत्येक नवा गोलंदाज किती तऱ्हेने बॉल टाकू शकतो ते तो आधी पाहून घेतो व एकदा सर्व गोलंदाजांचा अंदाज घेतला की आपली फलंदाजीची टोलेबाजी सुरू करतो. त्याने हा हा म्हणता आपल्या स्वतःच्या १५० धांवा केल्या. सी. एस. नायडूने ब्रॅडमनचा स्वतःच्या गोलंदाजीवर तेवीस धावा झाल्यावर झेल जर टाकला नसता सर कदाचित मॅचचा शेवट निराळाच झाला असता. हा सामनाहि अखेरीस अनिर्णीत राहिला. या सामन्यात आघाडीला दुसऱ्या इनिंगला फलंदाजी करण्यास अमरनाथने मला संधी दिली. पण मी दोन धावावरच पायचित झालो. नशिब जोरावर नव्हते खरे. प्रिन्स दुलिपसिंहांप्रमाणे प्रो. देवधरहि एका प्रस्थात वृत्तपत्राचे बातमीदार म्हणून या दौऱ्यावर आले होते. प्रो. देवधरांचे लिखाण संघाची बाजू राखूनच होई. दुलिप-सिंह कडक टीका करीत. पण त्यांचे तसे लिहिणे टीमच्या फायद्या-

**सुप्रसिद्ध क्रिकेटपटु श्री. रंगा सोहोनी १९४७-४८ च्या ऑस्ट्रेलियन दौऱ्यावर गेले होते. नंतर जवळ जवळ एक तपानंतर ( १९६० ) त्यांनी आपल्या ह्या दौऱ्याच्या सुरस आठवणी 'आनंदवन' मासिकात लिहिल्या. त्यातील ही काही स्मृतिचित्रे....**

साठीच होते ह्यात शंका नाही.

मेलबोर्न स्टेडियम भव्य आहे. ९५००० प्रेक्षकांना बसण्याची उत्तम सोय इथे आहे. इथे झालेल्या सामन्यात लालाने पहिल्या चेंडूपासून फटकेबाजीला सुरुवात केली. त्याच्या फलंदाजीने भारताच्या फलदाजीचे वैभव वाढले. भारतीय लोक इतर देशात जादूटोण्या-विषयी फार प्रसिद्ध आहेत. व अमरनाथने तर अक्षरशः जादूची कांडीच फिरविली. ब्रॅडमनने आपल्या एका पुस्तकात असे लिहिले आहे की "अमरनाथनी केलेल्या आजच्या खेळाप्रमाणे इतका चांगला व उच्च दर्जाचा खेळ मेलबर्न ग्राउंडच्या इतिहासात आतापर्यंत कुणीहि केलेला नाही." मला हा खेळ पाहाण्यास मिळाला म्हणून राहून राहून धन्यता वाटते. या स्कोअरमुळे व तो ज्या प्रसंगात त्याने केला त्यामुळे अमरनाथबद्दल पसरलेल्या त्याच्या कप्तान-पदाच्या लायकीबद्दलच्या सर्व खोट्या कल्पना धुवून निघाल्या, ह्याचा आम्हा खेळाडूंना फार आनंद झाला. हा सामना अनिर्णीत राहिला तरी तो अमरनाथने अमर करून टाकला असेच म्हणावे लागेल.

संध्याकाळची करमणूक म्हणजे जोडीजोडीने गप्पा मारत, दुकानातील 'शो-विंडोज' पहात भटकायचे. तास दोन तासा-नंतर एका चांगल्या 'मिल्कबार' मध्ये खूप मोठ्या ग्लासात दुधात आईस्क्रीम घालून गार गार प्यायचे. अशा कार्यक्रमात प्रो. देवधरहि आमच्याबरोबर असायचे. त्यांची झालेल्या सामन्याची मीमांसा ऐकण्यास फार गंमत वाटत असे. कधी कधी आम्ही सर्व खेळाडू नाचालाहि जात असू. अन्‌ इंडियन क्रिकेट टीमचे खेळाडू आले आहे असे समजताच प्रेक्षकांना व 'डान्स' करणाऱ्यात आनंद प्रकट होत असे. अर्थात्‌ रात्रीचे साडेदहा वाजता परत जाऊन प्रत्येकाने अकरा वाजायच्या आत झोपलेच पाहिजे असा कडक नियम असल्यामुळे पुष्कळ वेळा रंगलेला करमणुकीचा कार्यक्रम अर्धवट सोडून हॉटेलात परत यावे लागत असे.

सिडनी हे शहर तीन वस्तूंविषयी प्रसिद्ध आहे "It is wellknown for Three B's in the world" एक म्हणजे सिडनी ब्रिज, दुसरे सिडनी बोर्ड व तिसरा ब्रॅडमन. पूर्वी ब्रॅडमन अॅडिलेडला असे पण आता तो सिडनीला स्थायिक झाला होता.

**गचाळ क्षेत्ररक्षणाचे प्रात्यक्षिक**

सिडनीला लागोपाठ आमचे दोन सामने होते. पहिला 'न्यू साऊथ वेल्स'च्या टीमबरोबर होता. त्यांच्या टीमचा ऑर्थर










मॉरीस कॅप्टन होता. व त्याच्या मदतीला त्या वेळची जगात गाजलेली तुफान गोलंदाजीची जोडी रे लिंडवॉल व कीथ मिलर होती. त्यांच्या तुफान गोलंदाजीपुढे आमचा कितपत टिकाव लागतो याचीच शंका होती. ही एक मोठी परीक्षाच होती आमची. आमच्या संघात वेगाच्या गोलंदाजीमुळे कधीच घवराट होत नसे. उलट मनकड, हजारे, अमरनाथ अशा गोलंदाजीवर खूष असत. फडकर, किशनचंद, अधिकारी सहजरित्या खेळत. हजारेंनी घिम्मेपणाने खेळून १४४ धांवा केल्या. पण अमरनाथची तब्येत बरी नसल्याने तो फलंदाजी करू शकला नाही. त्यांच्या बाजूने मिलर व मॉरिस यांचा खेळ फार प्रेक्षणीय झाला. हजारे शिवाय मनकड व अधिकारीहि छान खेळले. पण त्यांचा संघ सरस ठरला. आमच्या संघाने झेल फार टाकले व त्यामुळेच सामना जिंकणे कठीण होत होते. शिवाय या सामन्यात क्षेत्ररक्षण फारच गचाळ झाले.

दुसरा सामना ऑस्ट्रेलियन एलेव्हनवरोबर होता. ह्यात ब्रॅडमन, ब्राऊन, मिलर होतेच. ब्रॅडमनने पुन्हा ठोकाठोक केली. पहिल्या जोडीतील विकेट पडल्यावरच ब्रॅडमन खेळण्यास येत असे व तो हटकून बोलिंग मोजतच असे. म्हणून पहिली जोडीच खेळत रहावी असे राहून राहून वाटे. त्यातला एक आऊट झाला की ब्रॅडमन यायचा. या सामन्यात आमची गोलंदाजी, फलंदाजी छानच झाली अन् क्षेत्ररक्षणहि उत्तम झाल्यामुळे आम्ही सामना जिंकला. करमणूक म्हणून येथील क्रिकेट क्लबने एक सहा तासांची लॉंचमधून सिडनी बंदर पहात पहात वेळ घालविण्याची एक सहल ठेविली होती. खाण्यापिण्याची चिक्कार रेलचेल होती. पिण्यासाठी तर 'बीअर'चे बॅरेल्स ठेवले होते. 'बीअर' हे ऑस्ट्रेलियाचे राष्ट्रीय पेयच आहे. आम्हाला विचारीत की तुमचे राष्ट्रीय पेय कोणते ? आम्ही त्याना सांगितले की 'पाणी !' त्यावर ते म्हणायचे की पाणी तर फक्त धुण्यासाठी वापरायचे असते. ("Water is meant for washing") हीच स्थिती युरोपमध्येहि आहे. गप्पा गोष्टी करीत व त्यांच्या खाण्यापिण्याची गंमत पहात ही सहल फारच मजेची वाटली. मध्येच एका सहलीत अमीर इलाहिमुळे 'मोगलाई' मसाला घातलेली मुर्गी खाण्याचा कार्यक्रमहि झाला. असा एखादा कार्यक्रम अधुनमधून असला म्हणजे खेळण्यामुळे आलेला थकवा बराच नाहीसा होता.

क्वीन्सलॅंडला झालेली मॅच फारच महत्वाची झाली. कारण ह्यात पुन्हा ब्रॅडमन खेळणार होता व वैशिष्ट्य असे होते की त्याची आतापर्यंत पहिल्या दर्जाच्या सामन्यात ९९ शतके झाली होती व ह्या सामन्यात शंभरावे शतक करतो की काय याकडे सर्व क्रिकेट विश्वाचे लक्ष लागले होते. या सामन्यात मला खेळण्याची संधी मिळाली. दररोज चाळीस हजार प्रेक्षक हजर होते. ब्रॅडमन खुषीत होता. त्याने १०० वी धांव काळजीपूर्वक घेतली व लोकांनी टाळयाचा कडकडाट केला. हा जागतिक विक्रम 'याचि देहि याचि डोळा' पहाण्याचा लाभ ज्यांना मिळाला ते खरे भाग्यवान ! आमची गोलंदाजी ब्रॅडमनने खूप पिटली. फटका मारल्यावर बंदुकीसारखा आवाज व चेंडू गोळीसारखा सीमेवर. 'नेपल्स पहावे व मरावे' अशी म्हण या सुंदर इटालियन शहराबद्दल प्रसिद्ध आहे. तसेच प्रत्येक क्रिकेटप्रेमी माणसाने 'ब्रॅडमनला खेळताना पहावे व मरावे' असेच मला म्हणावेसे वाटते. हिंदुस्थानात येऊन ब्रॅडमन एकदाहि खेळू शकला नाही म्हणून राहून राहून दुःख होते. मला वाटते त्या दिशेने जितका प्रयत्न होण्यास हवा होता तितका झालाच नाही.

'मरे' नांवाची मिलडूराची नदी अतिशय प्रेक्षणीय आहे. या नदीवर अनेक कालवे आहेत. मिलडूराची दोन दिवसांची मॅच आम्ही जिंकली. या सामन्याच्या वेळीच पहिल्या दिवसाच्या आदल्या रात्रीच पूज्य महात्मा गांधींच्या खुनाची बातमी समजली. आम्ही त्या दिवशी दुसऱ्या दिवशी सामना होता म्हणून सर्व लौकरच झोपलो होतो. पंकज गुप्ताने आम्हा सर्वांना उठविले. आम्ही सर्वजण हॉलमध्ये रेडिओशी कोंडाळे करून बसलो होतो. सारख्या बातम्या येत होत्या. दुसरे दिवशी सामना झाला. पण पायात एक प्रकारचा विचित्र जडपणा आला होता. व सर्वांचे मन तोच तोच दुःखद विचार करण्यात गुंग होते. ती मॅच आम्ही कशीतरी संपविली.

**कसोटी सामन्यात काय घडले ?**

पहिला कसोटी सामना ब्रिस्बेनला झाला. ब्रॅडमन १८५ धांवा काढून अमरनाथच्या एका बॉलला खेळत असता स्वतःचीच बॅट स्टंपला लागून बाद झाला. आठ गडी असतानाच ऑस्ट्रेलियाने ३८२ धांवांचा डोंगर रचला. आमच्या संघाचे क्षेत्ररक्षण फारच गबाळे झाले. कमीत कमी दहा बारा झेल हातातून टाकले. मला त्या इनींगला निदान ४ तरी बळी मिळालेच पाहिजे होते. पण नशीब नव्हते. एकामागून एक असे चार झेल सोडले. विकेट

**एक महान देश आणि त्याची तितकीच महान (मूर्ख) जनता !**




**भक्ति !**












## तुमच्या मुलाला उच्च शिक्षण घेता येईल का?

दहावीच्या परीक्षेंत मुकुंदाला ७१ टक्के मार्क मिळाले. पण त्याला वरच्या वर्गात जाऊन शिक्षण पुढें चालवणें अशक्य झालें आहे. पुष्कळ मुलें हुषार असून पैशांच्या अडचणींमुळें त्यांना शिक्षण अर्धवटच सोडावे लागते. आयुष्यांत थोडी कर्तबगारी करून दाखवायला लागणारी शिदोरीच त्यांना मिळत नाहीं.

तुमच्या मुलाला उत्तम प्रकारें उच्च शिक्षण मिळावे म्हणून तुम्ही निश्चित स्वरूपाची तरतूद केली आहे काय? अशी तरतूद करावयाचा एकमेव मार्ग म्हणजे विमा. ठरलेल्या वेळीं, ठरलेले पैसे तुमच्या मुलाला मिळतील. मग तुम्ही असा वा नसा. विमा उतरवा आणि आजच तुमच्या मुलाला वरच्या वर्गांत घाला.

थोड्याही बचतींत उच्च शिक्षणाची तरतूद करता येते. उदा: तुमचें वय ३०, मुलाचे वय २. दरमहा हप्त्यासाठीं बचत रु. २२.०५, विम्याची मुदत १६ वर्षे. मुलाला दर सहामाहीस ५०० रु. असे ५ वर्षांत रु. ५००० मिळतील.



**आयुर्विम्याला पर्याय नाहीं.**

PRATIBHA 672





अनुक्रमणिका

('Sticky Dog") विकेटवर पहिल्या डावात आमच्या ५८ धांवा झाल्या. दुसऱ्या डावात ९८ धांवा झाल्या. आमच्या संघाची ह्या असल्या चिकट हिरवळीवर जशी दुर्दशा झाली तशीच त्या परिस्थितीत ऑस्ट्रेलियाचीहि झाली असती.

दुसऱ्या कसोटी सामन्यात आमच्या सर्व बाद १८८ धांवा झाल्या. फडकरने ५१ व किशनचंदने ४४ धांवा केल्या. पावसाने आमचा पिच्छाच पुरवला. आस्ट्रेलियन्स म्हणत–"Indians have "brought the rain with them." त्या स्थितीत जी हिरवळ होती त्यावरून ऑस्ट्रेलियन संघहि फार टिकाव धरू शकणार नाही असे वाटत होते. फडकर हजारेंनी कमाल केली. ऑस्ट्रेलियाचे पट्टीचे फलंदाज एकामागून एक परत जाऊ लागले. ब्रॅडमनला हजारेने १३ वरच बोल्ड घेतले. ऑस्ट्रेलियाच्या सर्व बाद १०७ धांवा झाल्या. विकेट अजून तशीच खराब होती. आमच्या दुसऱ्या डावात सात बाद ६३ धांवा झाल्या. त्याच वेळी तुफान पावसास सुरूवात झाली. पाऊस थांबण्याची चिन्हे दिसेनात. आम्हाला पहिल्या डावाच्या ८१ धावा मिळाल्या व दुसऱ्या डावाच्या ६१ मिळून १४२ धांवा झाल्या होत्या. आम्ही आमचा दुसरा डाव पुरा करून जर आम्हाला दोन तीन तास वेळ मिळता तर आम्ही हा दुसरा सामना खचित जिंकला असता. ब्रॅडमनचे आता वचावाचे एकच साधन होते आणि ते म्हणजे पर्जन्य! आणि त्याला मनातून आपल्या त्या अस्त्राची खात्रीहि होती. म्हणूनच तो लबाड माणूस दर दोन तासांनी आमच्या ड्रेसिंग रूममध्ये येऊन मिस्कीलपणे म्हणायचा "Sorry Boys, Rain has not stopped yet.'" अन् त्याचे म्हणणे खरे झाले. म्हणजे पावसाने आमच्यासाठी चालून आलेली ही सुसंधी पार धुवून टाकली हेच खरे! या प्रसंगातून एवढे सिद्ध झाले की ऑस्ट्रेलियासारख्या बलाढ्य संघालाहि असल्या चिखलात खेळता येत नाही. पावसाला दोष देत आम्ही मग तिसऱ्या कसोटी सामन्याच्या तयारीला लागलो.

मेलबर्नच्या भव्य मैदानावर तिसरा कसोटी सामना होणार होता. अमरनाथ–मनकडने उत्कृष्ट गोलंदाजी करून ऑस्ट्रेलियाचा शक्तीशाली संघ अवघ्या ३९४ धावांत सफा केला. तरी ब्रॅडमनने पुन्हा हात दाखविलाच. त्याने १३२ धांवा केल्या. चंदू सरवटे व विनू मनकडने सलामीलाच १५२ धांवा केल्या. मनकड ११६ व चंदू सरवटे ३६. पण ब्रॅडमनने आपले डोके विलक्षण चालविले. हजारे फलंदाजीला आले असता गोलंदाजी त्याने बार्न्सला दिली. त्याने आपल्या पहिल्याच बोलवर हजारेना कॅच-आऊट केले. पाठोपाठ अमरनाथ आला. सत्तर हजार प्रेक्षकांच्या नजरा त्याच्या हालचालीवर लागून राहिल्या होत्या. पण बार्न्सच्या दुसऱ्या बॉलवर अमरनाथ पायचीत झाला. दुसऱ्या दिवशीच्या अखेरीस भारताच्या ६ बाद २६२ धांवा झाल्या. दुसऱ्या दिवशी विकेट ओली होती. नऊ गडी बाद झाल्यावर अमरनाथने खेळ पुरा केला. ब्रॅडमनने पुन्हा दुसऱ्या डावात शतक केले. मॉरिसनेहि नाबाद शंभर धावा केल्या. ४ बाद २५५ धांवा असताना त्यांनी खेळ संपविला. भारताचा दुसरा डाव १२५ धांवातच आटपला.

ॲडलेडच्या हिरव्यागार ओव्हल मैदानावर चौथा सामना सुरू झाला. ब्रॅडमनने यावेळी २०१ धांवा केल्या. ऑस्ट्रेलियन संघानें खेळ पहाणाऱ्या पंचेचाळीस हजार प्रेक्षकांस ६७४ धांवा करून फलंदाजीची उत्कृष्ट मेजवानीच दिली. पण आमचा संघ डगमगला नाही. हजारेने ११६ व फडकरने १२३ धावा करून एका वेळी ऑस्ट्रेलियन संघास बरेच नामोहरम केले. दुसऱ्या डावात हजारेने पुन्हा १४५ धांवा केल्या. पण शेवटी भारताला काही पराजय टाळता आला नाही. पांचव्या सामन्यात ऑस्ट्रेलियनांनी जमलेल्या ५० हजार प्रेक्षकांना ५७५ धांवाची पुन्हा मेजवानी दिली. आपले कसोटी सामन्यातील शतक पुरे करून हार्वेने १९४८ साली इंग्लंडला जाणाऱ्या संघात आपली जागा राखून ठेवली. भारताच्या ३३१ धांवा झाल्या. फॉलोऑन मिळाल्यावर मात्र काय झाले कुणास ठाऊक? संघाची वाजू अजिबात घसरली. शेवटच्या डावात भारताला अवघ्या ६७ धांवात गुंडाळून ऑस्ट्रेलियाने पूर्णपणे नामोहरम केले.

## टरबूज + आईस्क्रीम ?

सर्व खेळ व प्रवास संपवून आम्ही बोट निघण्याआधी काही दिवस पुन्हा पर्थला राहिलो होतो. उरलेली सर्व प्रकारची खरेदी इथेच करायची होती. प्रत्येकजण त्यातच गुंतला होता. मॅनेजरने आमचा १५०० रूपयांचा वाटाहि इथेच देऊन टाकला. त्यामुळे तर आमच्या खरेदीला ऊतच आला. आईस्क्रीम हा एक येता जाता खाण्याचा पदार्थ बनला होता. मी अमरनाथ, सेन व सरवटे खूपदा संध्याकाळचे फिरणे झाल्यावर बारमध्ये बसत होतो. व तेथे आम्ही आमची सर्वांत आवडती बनलेली वस्तू घ्यायची आणि ती म्हणजे टरबूज. ते अर्धे कापून त्यातल्या बिया काढून टाकायच्या व उरलेल्या पोकळीत आईस्क्रीम भरायचे व ते त्या फळाच्या गराबरोबर खायचे. शेवटच्या दिवशी अमरनाथने आमची बस मुद्दाम एका दुधाच्या हॉटेलसमोर थांबविली. सर्वांना एकदा शेवटचे आईस्क्रीम खाऊन घेण्यास सांगितले. कुणास ठाऊक पुन्हा कोण इकडे या देशात येतो?

या दौऱ्यावर असताना झालेले मजेशीर, आनंददायक आणि अविस्मरणीय असे प्रसंग मनःचक्षूंसमोर तरळत होते. ब्रॅडमनशी पहिले हस्तांदोलन, 'ब्रिस्बेन'चा चिखलातील सामना, मैल मैल लांबीचे द्राक्षांचे मळे, दामल्यांकडील वांग्याची भाजी, अननसाचा मळा . . . . .

असा हा माझा ऑस्ट्रेलियातील दौरा, ज्या हिंदी क्रिकेट खेळाडूंच्या नशिबात पुन्हा येईल तो भाग्यवानच समजला पाहिजे!

***



अनुक्रमणिका






# रांगणेकर मानकरी झाले

**सुप्रसिद्ध** मराठी नाट्य लेखक, दिग्दर्शक, निर्माते, श्री. मोतीराम गजानन रांगणेकर हे फेब्रुवारी १९६८ मध्ये गोव्यात भरणाऱ्या नाट्यसंमेलनाचे अध्यक्ष म्हणून अविरोध निवडून आले आहेत. ही घोषणा नुकताच त्यांचा जो प्रकट सत्कार करण्यात आला त्याप्रसंगी जाहीर करण्यात मराठी नाट्य परिषदेने औचित्य साधले आहे यात संदेह नाही. रांगणेकरांच्या नाट्यसेवेचा, त्यांच्या एकसष्टीचे निमित्त साधून सत्कार होत असतानाच मराठी नाट्यव्यवसायाच्या प्रातिनिधिक संस्थेने त्यांना हा त्या क्षेत्रापुरता सर्वोच्च समजला गेलेला बहुमान बहाल करावा हे त्या संघटनेचे व रांगणेकरांचेही थोर भाग्य ! वस्तुत: हा बहुमान रांगणेकरांकडे ह्यापूर्वीच चालत यायला हवा होता असे कुणीही म्हणेल. कारण रांगणेकरांची नाट्यविषयक सेवाच तशी मोठी व विविध स्वरूपाची अशी आहे. रांगणेकर हे आजच्या रंगभूमीच्या पायाचे दगड आहेत, एक शिल्पकार आहेत. जुन्या नव्या रंगभूमीचा तो एक सांधा आहे. नव्या परंपरेचे उद्गाते आहेत, असे त्यांच्याबद्दल म्हणता येण्यासारखी त्यांची कामगिरी आहे. इमारत वा मंदिराचा कळस पाहून पायाच्या दगडांबाबत उपेक्षेची भूमिका घेऊन चालत नाही. ते आपापल्या जागी घट्ट पाय रोवून उभे राहतात म्हणून इमारती उभ्या राहतात. मंदिराचा सोनेरी कळस झगझगतो. रांगणेकर अक्षरश: तन, मन, धनाने ह्या संक्रमणकाळी रंगमंचावर, पडद्याआड ताठपणे उभे राहिले. नवनवीन नाटके देत राहिले. प्रयोगावस्थेतल्या रंगभूमीला त्यांनी नवे विषय, नवे संगीत, नवा 'आटोपशीर' आकार दिला. त्या त्यांच्या प्रयत्नातल्या मर्यादांची त्यांना स्वत:लाच फार स्पष्ट जाणीव आहे. गरजेपोटी नाटके लिहिली, चिंतन, मनन, प्लॅनिंग वगैरे करीत बसलो नाही, ते शक्यही नव्हते. रात्री लेखन, सकाळी तालीम, पुन्हा रात्री पुढल्या भागाचे लेखन—सकाळी तालीम ह्या पद्धतीने त्यांची नाटके जन्मली. युगप्रवर्तन वगैरे त्यात नाही. तो हेतूही नव्हता; असं रांगणेकर स्वत:च त्याबद्दल बोलताना म्हणतात. त्यात विनयाचा भागही आहे आणि वस्तुस्थितीही आहे. रांगणेकरांचा लेखनाचा झपाटा इतका की 'कुलवधु'सारखे नाटक त्यांनी अवघ्या साडेचार दिवसात लिहिले. 'कुलवधु' नाटकाचे यश आपण जाणताच. 'गरजेपोटी' आणि 'धमाल घाईत' रांगणेकर सतत लिहित आले आहेत. रांगणेकर हे खरेखुरे नाटककार आहेत असे परवा कुणीतरी म्हणाले. माझ्या मते रांगणेकर खरेखुरे 'पत्रकार' आहेत. पत्रकाराचा झपाटा, साक्षेप, गति, निर्णय घेण्याचे व ते कार्यान्वित करण्याचे कसब, निर्णायक शक्ति, आटोपशीरपणे मजकूर खुलविण्याची किमया, सुयोग्य, सूचक, काव्यात्म नामकरण ह्या साऱ्या गोष्टी त्यांच्यातला 'पत्रकार' सतत 'सजीव' आहे हेच सूचित करतात. रांगणेकर बरेचसे काही होत राहिले. पण त्यांचे मूळ स्वप्न मात्र चित्रकार होण्याचे होते. चित्रकार रांगणेकर शालेय जीवनातच 'पत्रकार' झाले. पुढे चित्रनिर्माते झाले, चित्रपट कथा लेखक-दिग्दर्शक झाले. ओडियन कंपनीत तीन मिनिटांची छोटी नाटके लिहिणारे नाटककार रांगणेकर पुढे तीन तासांची मोठी नाटके लिहिणारे नाटककार झाले. प्रवास चालूच होता. एकांकिकांचे नवे प्रयोग होत होते, तिघांनी मिळून नाटक लिहिण्याचा प्रयोगही झाला. मग आकाशवाणीत अनेक 'प्रयोग' झाले. निवृत्तीनंतरही प्रयोगशील रांगणेकर स्वस्थ बसले नाहीत. कारण 'निवृत्ती' हा शब्द रांगणेकरांच्या कोषातच बसत नाही. रांगणेकरांचा धर्म 'गति' हा आहे. जे जे येईल ते स्वीकारायचे, त्यात जीव ओतायचा. मातीचेही सोने करायचे हा स्वभाव. त्यामुळेच रांगणेकर खचले—पिचले नाहीत. निवृत्त होऊनही निवृत्तीचा वारा त्यांच्या वयाला भिववीत नाही. नाही त्यावर मात करणे ही आहे त्यांची प्रकृति. रसिकता कायम आहे. त्यामुळेच रांगणेकर स्वत:ही हसतात. आणि भोवतीही आनंद पेरतात. गप्पांचे आणि हसण्याचे लेणे घेऊन हा माणूस वातावरणाला सजीवतेचा स्पर्श करून जातो. सत्काराला उत्तर देताना रांगणेकर गहिवरले. मनाचा कोमल पण वृत्तीचा जिद्दी असा हा माणूस ! यशापयशाने माणसे चळतात. खचतात. रांगणेकरांनी वृत्तपत्रे काढली. त्यात 'स्वयंभू'पणा सिद्ध केला.






नाटकाप्रमाणेच पत्रसृष्टीतल्या आजच्या अनेक उपक्रमांचे जनक ते आहेत. ही सारी धडपड करताना 'मीत्व' जपले पण अहंकाराचा वारा लागू दिला नाही. त्यांच्या लेखनाची वृत्तपत्रांची कात्रणे, फाइल्स सुद्धा त्यांनी जपलेली नाहीत. ही वृत्ती लेखकात क्वचित दिसते. आपल्या हस्ताक्षरातले साधे चिठोरे सुद्धा जपून ठेवणाऱ्या माणसात रांगणेकर हे आगळेच वाटतात ते त्यामुळे ! परिस्थिति बदलली, व्यवसाय बदलत गेले, प्रवास घडला, माणसे आली व गेली पण रांगणेकरांना मी वीस वर्षांपूर्वी जसे व ज्या पोषाखात पाहिले तसेच ते आजही दिसतात. पोषाखाबद्दलची ही विशिष्ट आवड, हा साक्षेप स्वातंत्र्यवीर सावरकर यांचा होता असे मला स्मरते. ह्याचे कारण मला असे वाटते की, रांगणेकर 'स्व-तंत्र' आहेत. प्रवाहातही 'अ-चल' राहण्याची किमया त्यांना साधलेली आहे. रांगणेकर हे नाटककार म्हणूनही स्वतंत्र आहेत. तसे दिग्दर्शक म्हणूनही ! 'लेकुरे उदंड जाली', 'भटाला दिली ओसरी' तो मी नव्हेच, राणीचा बाग ह्यासारखी नाटके त्यांच्या नाटच-निर्मितीतल्या स्वयंभूपणाची ग्वाही देतील. नाटच-लेखन स्थगित केले–झाले असले तरी रांगणेकर-दिग्दर्शित अनेक नवनवीन नाटके रंगमंचावर येत आहेत. रांगणेकरांच्या कसबी स्पर्शाची किमया मराठी नाटचरसिकांना ठाऊक झाली आहे. पटलेली आहे ह्याचेच हे सूचन नव्हे काय? रांगणेकरांना भव्य स्वप्ने पडताहेत. ती स्वप्ने पडणे हेच मी त्यांच्या चिरतारुण्याचे गमक मानतो. रांगणेकरांच्या सहवासात तास दोन तास घालविले तर (त्यांचे व आपलेही) वय विसरायला ते सहज लावतील. हे सहज घडते. 'पोझ' घेऊन नाही. तो त्यांचा स्वभाव आहे. तो त्यांनी राखला आहे.

"नाटककार रांगणेकर" हे 'व्यक्ति' रांगणेकरांप्रमाणे वादातीत नव्हते. नाहीत. तसे जगात काहीच वादातीत नसते. अगदी देवसुद्धा असे मी मानतो. पण नाटककार रांगणकरांचे नांव केवळ सांघा म्हणूनच लक्षात राहील असे मला वाटत नाही. त्यांच्या नाटचलेखनातील गुणवत्तनेही ते राहील. 'लौकिक यशाचे' गणित इथ गृहित घरलेले नाही. चांगले आणि तरी यशस्वी असे नेहमीच घडत नाही. रांगणकरांनी लिहिलेल्या अठरा नाटकांपैकी आशीर्वाद, कुलवधु, माझे घर, रंभा, जयजयकार, भटाला दिली ओसरी, अमृत व हिमालयाची बायको व वहिनी ही नाटके मला स्वतःला मोठी वाटतात. ह्यातले काही विषय तर 'काला' वर मात करून राहणार आहेत. त्यांचे 'गरजेपोटी' हे स्वरूप घ्यानी घेऊनही त्या नाटकांनी मराठी नाटकाला काही चांगले दिले आहे असे मला वाटते. रांगणेकरांची नाटके डावलून मराठी नाटकांचा अभ्यास पूर्ण होऊ शकेलसे मला वाटत नाही. रांगणेकर एकसष्ट वर्षांचे झाले. बांदोडकरांचा 'रांगणेकर शताब्दी' असा उल्लेख वारंवार (चुकून) होत होता. चुकून सुद्धा सदिच्छा जर व्यक्त झाली तर 'तथास्तु' असे सतत म्हणणारा कालपुरुष ती इच्छा फलद्रुप करतो ते घडतेच. रांगणेकरांच्या बाबतही ते घडो. त्यांची भव्य स्वप्ने साकारोत अशी इच्छा व्यक्त करून आम्ही त्यांचे 'नाटचसंमेलनाध्यक्ष' म्हणून अभिनंदन करतो.

## 'पठ्ठे बापूराव' ल. ना. भावे

पठ्ठे बापूराव ल. ना. भावे यांचे अभिनंदन! 'पठ्ठे बापूराव' हा शब्दप्रयोग मी जाणून बुजून केला आहे. 'पठ्ठे बापूराव' हे नाटचनिकेतनने १९५९ साली रंगभूमीवर आणलेले नाटक ल. ना. भावे ह्यांनीच लिहिले होते व त्यांना परिचित 'बापूराव' याच नावाने संबोधतात. पठ्ठे म्हटले ते त्यांच्या गौरवार्थ! 'सोव्हिएट देश'च्या वतीने दिल्या जाणाऱ्या नेहरु पारितोषिकाचे यंदाचे ते मानकरी आहेत. भावे यांच्या "पंडित नेहरु–सांस्कृतिक दर्शन" ह्या ठोकळ प्रकाशनाने प्रसिद्ध केलेल्या पुस्तकाचा गौरव करून ८००० रु. चे 'नेहरु पारितोषिक' त्या पुस्तकाचे लेखक श्री. ल. ना. भावे ह्यांना ते देण्यात आले आहे. मराठी ललित लेखकांपैकी अनंत काणेकर यांनाही एक पारितोषिक देण्यात आले आहे. पण ल. ना. भावे ह्यांचे मी ह्याप्रसंगी खास अभिनंदन करतो. मागे त्यांच्या 'समरांगण' ह्या नाटकाला सांगलीला खास पुरस्कार मिळाला होता. आता त्यांच्या नव्या पुस्तकाला हा 'रशियन' पुरस्कार मिळत आहे. 'नेहरू' हा विषय मोठा व विविधांगी असा आहे. पंडित नेहरू हे एक लोकनेते तर होतेच. पण आपल्याच नव्हे तर अन्य देशातल्या लोकनेतृत्वाला जसे अनेक स्तर असतात तसेच ते पंडित नेहरूंच्या व्यक्तित्वालाही होते. त्यामुळे नेहरूंचा अभ्यास आता होत आहे. राहीलही. ल. ना. भावे. ह्यांची नेहरु-निष्ठा मला ठाऊक आहे. नेहरू-निष्ठेतूनच नेहरूंचा हा वेगळा व मौलिक अभ्यास जन्म पावला आहे. तो आता 'कीर्त' मिळवीत आहे. 'द्रव्य साधन' देत आहे. पण भावे ह्यांची लेखनाची पद्धत मला ठाऊक आहे. ती उत्स्फूर्त आहे. लौकिक प्रलोभनांचा मोह तिला नाही. ती कमी लिहिते पण भासले, भावले, उमाळून आले की लिहिते. त्यामुळेच भावे पुष्कळ वर्षे लिहीत आहेत तरी लिहिण्याचा सोस त्यांच्या लेखणीला नाही. 'ग्लॅमर' नाही: ती लेखणी काहीशी स्थितप्रज्ञाची आहे. वृत्ति स्थितप्रज्ञाचीच. कथा, कादंबरी, राजकीय लेखन, वैचारिक निबंध, नाटके इत्यादि विविध क्षेत्रात त्यांची लेखणी संचार करते. रेडियोच्या श्रुतिका, एकांकिकाही तिने लिहिल्या आहेत. 'नाटक झाले जन्माचे' (कादंबरी) व विसावा (कथासंग्रह) ही त्यांची अगदी अलिकडील पुस्तके. "पंडित नेहरु–सांस्कृतिक दर्शन" हे बक्षिसाचे पुस्तक!! भावे हे लेखक आहेत त्यापेक्षा थोर वाचक आहेत. ते सतत, न कंटाळता वर्षानुवर्षे अगदी 'ताजे' वाचन करीत आहेत. वृत्ति साधकाची, शांत, प्रसिद्धिविन्मुख. संघर्षाचा स्वभाव नाही. धकाधकीपासून दूर राहून वाचन–चितन लेखन करावे ही धारणा! अनेक वाङ्मयीन उपक्रमांचे जनक (सरस्वती मंडळ, कल्याण) लोकसेवा मंडळ, डोंबिवलीचे वतीने १९५५ साली झालेल्या मुंबई उपनगर साहित्य संमेलनाचे ते सरकार्यवाह होते. पण एकूण असल्या गोष्टी फारशा रुचणाऱ्या नाहीतच. लिहितील पण लिहिण्याबद्दल खूप बोलण्याच्या ह्या काळात ते स्वतःच्या लेखनाबद्दल अबोलच राहतील. 'पठ्ठे बापूराव' नाटक दिले. मग तालमी चालू होत्या. नाटककार भावे मात्र तिकडे फारसे फिरकले नाहीत. "लिहिले–दिले–होत आहे–पाहू या" अशा स्थितप्रज्ञ वृत्तीने भावे वागत होते. समाजसेवेची हौस आहे. पण वयपरत्वे आता त्यासाठी लागणारी अटीतटीची वृत्ति त्यांची नाही. कल्पना देणे, सल्ला देणे, मार्गदर्शन करणे इत्यादि गोष्टी ते करतात. ते करतानाही 'आब' नाही. असा हा निरहंकारी माणूस! साधक. शांत असा. पण आज साधनेचा गौरव झालेला आहे. मराठी लेखकांपैकी कुठल्याही कँपमध्ये नसूनही केवळ लेखन-गुणावर यश संपादन करणाऱ्या भाव्यांचे अभिनंदन करणे आवश्यक आहे. प्रसिद्धीची हाव त्यांना नाही. अशा माणसाच्या यशाचे खास कौतुक व्हावे असे प्रामाणिकपणे वाटते.

'पठ्ठे बापूराव' अभिनंदन!

[पृष्ठ ५८ वर पहा]





अनुक्रमणिका



# इंद्रधनुष्य

# गिरीश कर्नाड यांचे 'ययाति'

—ज्ञानेश्वर नाडकर्णी

**इंडियन** नॅशनल थिएटरने दोन महिन्यांपूर्वी रंगमंचावर आणलेल्या 'ययाति' या हिंदी नाटकात भारताच्या उत्तरेच्या व दक्षिणेच्या दोन लक्षणीय तरुण कलावंतांच्या प्रतिभेचा संगम झालेला होता.

'ययाति' या मूळ कानडी नाटकाचे लेखक श्री. गिरीश कर्नाड. त्यांचे 'तुघलख' हे आल्बेर काम्यूच्या 'कॅलिग्यूला' (ज्याचे भ्रष्ट रूपान्तर आपल्याला दारव्हेकरांच्या 'चंद्र नभीचा ढळला'-मध्ये पाहायला सापडते!) या नाटकावर आधारलेले कानडी नाटक यापूर्वी फार गाजलेले. 'तुघलख'च्या हिंदी अनुवादाचा प्रयोग दिल्लीत अल्काझींच्या विद्यार्थ्यांनी बसविल्यापासून तर कर्नाड यांच्याकडे नाट्यप्रेमी रसिकांचे लक्ष फार मोठ्या प्रमाणात वेधले गेलेले.

'ययाति'चे दिग्दर्शक श्री. सत्यदेव दुबे हे पूर्वीच्या जमान्यातले अल्काझींचे एक शिष्योत्तम. त्यांच्या दिग्दर्शनकलेची सारी वाढ अल्काझी मुंबई सोडून दिल्लीला निघून गेल्यावरच झालेली. अल्काझींच्या नेतृत्वाखाली थिएटर युनिट या संस्थेने आपले लक्ष मुख्यत: इंग्रजी नाटकांवर केंद्रीत केलेले होते. दुबे यानी थिएटर युनिटचा झेंडा उंच फडफडत ठेवण्याच्या प्रयत्नात "अंग्रेजी हटावो!" अशी डरकाळी फोडली, अन् सातत्याने हिंदी नाटके रंगमंचावर आणली.

गेल्या काही वर्षात धर्मवीर भारती व मोहन राकेश यांच्या हिंदी नाटकाखेरीज यूगो बेटी, सार्त्र, पिरांदेलो, इब्सेन, आद्य रंगाचार्य, इ. इटालियन, फ्रेंच, नॉर्वेजियन, कानडी नाट्यमहर्षींच्या कलाकृतींचे एकाहून एक नीटस प्रयोग दुबे यांनी हिंदीमध्ये सादर केलेले आहेत. मराठी प्रेक्षकवर्गात त्यांचे चाहते निर्माण झालेले आहेत एवढेच नव्हे तर काही मराठी नटचाही त्यांच्या नाटकात चमकलेल्या आहेत—रेखा सबनीससारख्या नटीने तर 'आषाढ का एक दिन' या राकेश यांच्या कालिदासाच्या प्रेमजीवनावर आधारलेल्या नाटकातच आपले अभिनयनैपुण्य पणाला लावलेले आहे.

दुबे हे हिंदीचे कट्टे पुरस्कर्ते असले तरी ऑक्सफर्ड–केंब्रिज सोसायट्यांनी जेव्हा फॉर्स्टरचे 'अ पॅसेज टु इंडिया' हे नाटक बसविले तेव्हा त्यातील डॉ. अझीझच्या भूमिकेसाठी निखळपणे त्यांचीच निवड झाली. त्यांचे स्वत:चे उत्साहाने थबथबणारे अन् निरागस व्यक्तिमत्व त्या भूमिकेशी इतके जुळून दिसले की साहेबलोकांनी आपल्या या 'शत्रू'चे अपार कौतुक केले.

एवंगुणविशिष्ट श्री. दुबे यांच्या दिग्दर्शनकौशल्याचा 'ययाति' हा एक उच्चांक.

कर्नाड यांचे नाटक म्हणजे दोन दोन प्रमुख पात्रांमधल्या स्फोटक संघर्षांची एक मालिका आहे: ययाति राजांची राणी म्हणून मिरविणारी शुक्राचार्यांची कन्या देवयानी आणि तिची दासी म्हणून राजगृहात आलेली असुर राजकन्या शर्मिष्ठा यांच्यामध्ये उंदरामांजरातल्या सारखा जीवघेणा खेळ चालू असतो. त्यात हस्तक्षेप करण्याच्या भरात ययाति स्वत:च शर्मिष्ठेचा दास बनतो आणि त्यामुळे कोपायमान झालेल्या शुक्राचार्याला आपल्याला शाप द्यावयास प्रवृत्त करतो. ययातीचे चिरतारुण्य संपून तो चारचौघांसारखा जराजर्जर होईल असा शुक्राचार्य शाप देतात. त्याच सुमाराला ययातीचा मुलगा पुरु हा आपली नवविवाहित वधू चित्रलेखा हिला घेऊन राजगृही परत येतो. शापाची हकीकत ऐकताच तो शुक्राचार्यांकडे रदबदली करतो आणि असा उ:शाप मिळवितो की दुसरी कोणतीही व्यक्ती जर ययातीचे म्हातारपण उसने घ्यायला तयार असेल तर राजा शापमुक्त होऊ शकेल! ययातीला असा एकही माणूस आपल्या साम्राज्यात सापडत नाही! अखेर पुरूच मन घट्ट करून आपल्या बापाला मिळालेल्या शापाचे ओझे आपल्या माथी घेतो.

पुराणातल्या या परिचित कथेला कर्नाड यानी दिलेली कलाटणी अतिशय हृद्य आहे. प्रथमत:च शर्मिष्ठेचे पात्र त्यानी मोठ्या प्रभावीपणे रंगविलेले आहे. राणीच्या तोऱ्यात देवयानी तिच्याशी अतिशय उद्दामपणे वागत असते. परंतु पूर्वाश्रमीच्या अनुभवांची साक्ष ठेवून शर्मिष्ठा अजूनही ययातीच्या अंगच्या वासनेला भुरळ घालीत असते. अपमान सहन न होऊन जेव्हा शर्मिष्ठा विष पिण्याचा प्रयत्न करते तेव्हा तिला परावृत्त करीत असताना ययाति तिच्या उजव्या हाताला स्पर्श करतो—आणि अजाणतेपणी, संकेताप्रमाणे, तिच्याशी विवाहवचनाने बांधला जातो! शर्मिष्ठेशी विवाहबद्ध होण्याच्या त्याच्या निर्धारामुळेच देवयानी राजगृह सोडून निघते, अन् तिची कड घेऊन नाटकात प्रत्यक्ष न दिसणारे शुक्राचार्य ययातीला शाप देतात.

देवयानी–शर्मिष्ठा व शर्मिष्ठा–ययाति यांच्यातील संबंधांचे विश्लेषण अत्यंत नाट्यपूर्ण पद्धतीने करून झाल्यानंतर कर्नाड ययाति–पुरू या जोडीकडे वळतात. ययाति हा जगज्जेता वीर-







पुरुष; गुरुगृही असताना पुरूची तुलना सारखी त्याच्या दिग्विजयी वडिलांशी केली जाते, आणि इतरेजनच नव्हे तर त्याची नवपरिणित वधू चित्रलेखासुद्धा त्याला तुच्छ लेखते. नाटकाच्या उत्तरार्धात या वस्तुस्थितीतून जन्माला येणारा उपरोध कर्नाडांनी आपल्या मनात पुरेपूर ठसविलेला आहे. वीरपुरुष ययाति ऐन वेळेला आपल्याला मिळालेल्या शापामुळे भेदरून जातो तर सर्व जगाने ज्याची हेटाळणी केलेली तो पुरू—नुकताच विवाहबद्ध झालेला पुरू—आपल्या वडिलांना शापमुक्त करण्याचे प्रचंड मनोधैर्य दाखवितो.

खरा, शोकात्म आशय मनात ठसविणारा उपरोध तर यापुढेच आहे! पुरूची ही कृति पाहून त्याला तुच्छ लेखणारी त्याची पत्नी चित्रलेखा पश्चात्तापदग्ध होते; परंतु जराजर्जर पुरूचे प्रत्यक्ष स्वरूप मात्र तिला पाहवत नाही! त्याच्या शरीरात झालेले ते भयानक स्थित्यंतर पाहून कोवळ्या वयाची चित्रलेखा विषप्राशन करते. कर्नाड यांचे नाटय अशा प्रसंगात इतके प्रभावीपणे खुलते की ययाति आपल्या सुनेला आत्महत्येपासून परावृत्त करू शकत नाही—कारण तिच्या उजव्या हाताला स्पर्श झाला तर! सासऱ्याच्या डोळ्यादेखत मृत्युमुखी प्रवेश करणारी चित्रलेखा कडवटपणे हसत त्याला आव्हान देते: "कर! कर! मला स्पर्श कर! प्रत्यक्ष सुनेशी विवाह करावा लागेल याची तुझ्यासारख्या वासनादग्ध राजाला भीति कां? आपल्या मुलाचे तारुण्य हिरावून घेतलेस; मग त्याच्या निकामी झालेल्या पत्नीचा ताबा घ्यायला कां कचरतोस?" असे हे नाटक सारखे चढत जाते. चित्रलेखेला उत्तर न देऊ शकणारा ययाति तिच्या आत्महत्येनंतर पश्चात्तापाने पुरा पोळून निघतो आणि पुरूपासून आपले म्हातारपण पुन्हा मागून घेतो, इथेच नाटक संपते.

शिरवाडकरांच्या 'ययाति आणि देवयानी' या नाटकाशी तुलना करता, आणि वरील प्रसंगातील भेदक नाटच लक्षात घेता, केवळ थोडीफार जादू करून शिरवाडकर आपल्या नाटकाच्या तिसऱ्या अंकात ययातीला पुन्हा त्याचे तारुण्य मिळवून देतात, आणि म्हणून पहिल्या दोन अंकांपेक्षा कमी पडतात हे लक्षात येईल. कर्नाडांच्या कथानकात व भूमिकापरिपोषात नाटच ओतप्रोत भरलेले आहे, तर शिरवाडकरांच्या नाटकाचे पहिले दोन अंक त्यांच्या भाषेचा तत्वचिंतनात्मक असा एक आगळाच काव्यविलास दाखवितात. कर्नाडांच्या नाटचरचनेला प्राचीन ग्रीक शोकात्मिकेचा कणखरपणा लाभलेला आहे, आणि शर्मिष्ठेच्या व्यक्तिचित्रामुळे ते स्मरणीय ठरलेले आहे.

शर्मिष्ठेची ही भूमिका तरला मेहता यांनी केलीसुद्धा वाघिणीच्या जोषात. खरे म्हणजे या प्रयोगातील साऱ्याच स्त्रीभूमिका चांगल्या झाल्या. देवयानीच्या भूमिकेत सुनीला प्रधान ही नवोदित महाराष्ट्रीय नटी खरोखरीच नेत्र सुखवून गेली (याचे श्रेय केवळ वेषभूषेला नसून तिच्या शरीरसौष्ठवाला आणि बेअरिंगलासुद्धा आहे!) स्वर्णलता या दासीची भूमिका व चित्रलेखेची भूमिका अनुक्रमे सौ. सुलभा देशपांडे व आशा कामेरकर या भगिनींनी समजून उमजून केल्या. ययातीच्या व पुरूच्या भूमिकात अमरीश पुरी व स्वतः दुबे शोभून दिसले.

या नाटकाचे जरूर मराठीत रूपान्तर व्हायला हवे—अन् शक्य तर त्यातील महाराष्ट्रीय नटी कायम ठेवून त्याचे प्रयोगही!

★ ★

# चित्रपटमहोत्सवांचा धूमधडाका

ऑक्टोबरात फिल्म फोरमने तपन सिंहा या बंगाली चित्रपटदिग्दर्शकाच्या सहा चित्रपटांचा महोत्सव आयोजित केलेला होता. 'क्षुधित पाषाण' आणि 'काबुलीवाला' ही त्यांची टागोरांच्या कथांवर आधारलेली चित्रे आपल्याला आठवत असतील. सत्यजित राय व ऋत्विक घटक यांच्याशी तुलना करता ते अगदी मिळमिळीत वाटतात; परंतु आंतरराष्ट्रीय चित्रपटमहोत्सवातून त्यांच्या चित्रपटांना चांगला भाव असतो! 'काबुलीवाला'मधील एकमेव उल्लेखनीय भाग म्हणजे छबी विश्वास या श्रेष्ठ नटाची काबुलीवाल्याची भूमिका; तर 'क्षुधित पाषाण' सावरले गेले ते अली अकबर खां यांच्या मन धुंद करणाऱ्या पार्श्वसंगीताने, विशेषतः त्यातील कथ्थक नृत्याच्या साथीने!

'अतिथी' हा टागोरांच्या कथेवर आधारलेला आहे. यातील मध्यवर्ती पात्र आहे एक खेडवळ मुलगा. लहानपणापासून त्याला निसर्गाची ओढ असते. ती इतकी की त्यामुळे अधुनमधून तो खुशाल आपले घर सोडून जातो! त्याचा मोठा भाऊ अन् त्याची आई त्याला ताळ्यावर आणण्याचा खूप प्रयत्न करतात, पण व्यर्थ!

स्वतः बासरी वाजविण्याचा छंद असलेला हा मुलगा एकदा घर सोडून नाटक कंपनीबरोबर मुशाफिरी करतो! एकदा पवित्र क्षेत्रांची यात्रा संपवून आलेले एक श्रीमंत कुटुंब त्याला भेटते. त्या मुलाचा निरागस गोडवा पाहून ते दांपत्य त्याला आपल्या आश्रयाला ठेवते, पोटच्या मुलासारखे वागवते. त्यांची स्वतःची मुलगी लाडावलेली, हट्टी अशी असते. साधारणपणे समान वयाच्या या दोन मुलांमध्ये उडणारे खटके तपन सिंहांनी फार कौशल्याने रंगविलेले आहेत.

अखेर त्या मुलीचे आईवडील त्या मुलाला जावई करून घ्यायचे ठरवितात. परंतु एव्हाना त्या मुलाला निसर्गाची हाक पुन्हा एकदा ऐकू आलेली असते, अन् तो आपल्या आश्रयदात्याचे घर सोडून, नदीकाठाने पलीकडे पसरलेल्या विस्तीर्ण क्षितिजाच्या दिशेने चालूही लागलेला असतो! हाच या हृदयस्पर्शी कथानकाचा शेवट.

मागील खेपेला 'बालिका वधू' या बंगाली चित्रपटाबद्दल लिहिताना ज्या पार्थ मुकर्जीचा उल्लेख केला तोच या मुलाचे काम करतो. इतर पात्रांची योजनाही फारच चपखलपणे झालेली आहे. त्यातील एका चिमुरड्या बालविधवेचे पात्र मनाला चटका लावून जाते.

सिंहांच्या 'निर्जन साइकाते' या चित्रपटात जगन्नाथपुरीच्या यात्रेला निघालेल्या काही स्त्रियांच्या प्रवासाचे चित्रण आहे. त्यांना एका तरुण लेखकाची सोबत लाभते, आणि त्या वेगवेगळ्या प्राचीन वास्तूंच्या सान्निध्यात तो या प्रवासी स्त्रियामधील एका व्यथित तरुणीच्या मनाचा गुंता सोडविण्याचा प्रयत्न करतो असे या चित्रपटाचे कथानक आहे. 'अतिथी'प्रमाणे याही चित्रपटाचे चित्रिकरण प्रत्यक्ष स्थळी (उदा. पुरी, कोनारक येथे) करण्यात आलेले आहे. त्यातील लेखकाची भूमिका सत्यजित राय यांच्या 'कांचनगंगा', 'महानगर' आदि चित्रपटांतून चमकलेल्या अनिल चतर्जीने आपल्या सहजतापूर्ण अभिनयाने नटविलेली आहे, तर त्या तरुणीची भूमिका सत्यजित राय यांनीच प्रथम पडद्यावर आणलेल्या शर्मिला टागोरने हळुवारपणे, संयमाने केलेली आहे. 'पहाडी संन्याल' या न्यू थिएटर्सच्या जमान्यात गाजलेल्या नटाने या चित्रपटात एका विलासी परंतु उमद्या स्वभावाच्या, साठीतल्या जमीनदाराची भूमिका केलेली आहे; ती त्याच्या व्यक्तिमत्वामुळे लक्षात राहते.

मुंबईतल्या फिल्म सोसायट्यांनी नुकताच एक फ्रेंच चित्रपटमहोत्सवसुद्धा साजरा केला. आनंदम, फिल्म फोरम व सुचित्रा या त्या तीन सोसायट्या फ्रेंच वकिलातींकडून खास आलेल्या व

[पृष्ठ ५८ वर पहा]

## घोळच घोळ–
## आपला राष्ट्रीय खेळ

**आपला** राष्ट्रीय पक्षी मोर, राष्ट्रीय गीत 'जनमनगण' (वंदे मातरम् सेकंडरी बरं का), तसाच आपला स्वराज्यानंतरचा 'राष्ट्रीय खेळ' कोणता असा मला प्रश्न विचारला तर मी क्षणाचाही विलंब न करता उत्तर देईन, "घोळ घालीत बसणे". ह्या खेळाचे बाबतीत आम्ही कुठल्याही जागतिक क्रीडा-स्पर्धेत अजिक्य पद मिळवून दाखवू शकू असा विश्वास गेल्या वीस वर्षांत आम्हाला आलेला आहे. साधारणपणे एखाद्या खेळातले प्राविण्य हे त्या त्या व्यक्ती-पुरतेच मर्यादित असते. माणूस गेला की ते प्राविण्य काळाच्या पडद्याआड जाते. आमचा राष्ट्रीय खेळ तसा नाही. ह्या खेळाची एक खुर्ची आहे. त्या खुर्चीत बसले की ते प्राविण्य विनासायास येते. 'खुर्चीचा गुण' असं आपण म्हणतो ना. तसलाच प्रकार! त्या खुर्चीचे नांव आहे 'भारताचे पंतप्रधानपद!' ह्या राष्ट्रीय खेळाचे जनक होते पंडित नेहरू. आजच्या वारस व चतुरस्त्री खेळाडू आहेत इंदिराजी! माणसाला इथे महत्व नाही. खुर्चीला महत्व. कारण त्या खुर्चीवर जाऊन बसेपर्यंत ही माणसे आपापली कामे मोठी कसबी पद्धतीने करतात. खुर्चीचा स्पर्श झाला रे झाला की, 'घोळा'चा 'राष्ट्रीय खेळ' सुरू!

'भाषिक राज्ये' निर्माण करण्यामागचे तत्व मोठे चांगले. हेतु चांगला. विना-घोळ ते घडले असते तर कदाचित 'सुवर्ण'ही हाती आले असते. पण 'तत्वशून्य' तडजोडी आणि 'न्याय'शून्य मंडळे–समित्या यामुळे "नकोत ती भाषिक राज्ये", असे म्हणण्याची पाळी खुद्द उपराष्ट्रपतीनाही आली. (ते 'युनिटरी फॉर्म'ची राज्य-पद्धती हवी असं नुकतेच म्हणाले) पण कुठलाही प्रश्न धैर्याने, परिस्थितीचा सर्व अंदाज घेऊन सोडवि-ण्याची धमकच राज्यकर्ते दाखवू शकत



नसल्याने भाषिक राज्यांचे ऐवजी भाषिक वाद उत्पन्न झाले आहेत. हे वाद 'रणां-गणावर' पाक युद्धापेक्षा जास्त सैन्य आणून सोडविण्याची धमकी देण्याइतपत 'अहिंसक' काँग्रेसी आमदार प्रगति करू शकले आहेत. हे चिन्ह ह्या राष्ट्रीय खेळा-चीच निर्मिती आहे. 'भाषिक राज्ये' निर्माण करताना काही तत्वे, काही सिद्धांत, नियम आधारभूत नसल्याने असंतोषाचे उद्रेक उफाळून येतात. बेळ-गाव कारवारच्या प्रश्नाबाबतची भूमिका अशीच 'गलथान' होती व महाजन अह-वालाने तर नवा गोंधळ उत्पन्न करून ठेवला आहे. 'लोकमानस' ध्यानी घेण्याची भाषा लोकशाहीत नेहमीच बोलली जाते. बोलणे श्रेयस्करही असते. सेनापति बापट ह्यांनी प्राणांतिक उपोषण सुरू केले तेव्हा धावाधाव झाली. महाजनांची नियुक्ति झाली. त्याही वेळी "जनतेच्या 'भावना'ना कौल लावण्यात येईल. मान दिला जाईल." अशी भाषा बोलली गेली. नवा घोळ सुरू झाला. कमिशन नेमले. तत्व, सिद्धांत नाही. इंदिराजींनी बॅ. नाथ पैंच्या द्वारे दिलेल्या आश्वासनाची कदर केलीच पाहिजे असे बंधन महाजनांवर नाही. मग "न्याय-मूर्ति" महाजनांनी काटा हाती घेतला. आणि एखाद्या एकाधिकारी सत्ताधीशा-प्रमाणे 'सिद्धांतशून्य' वाटप करून टाकले. 'पुन्हा नवा घोळ' सुरू झाला आहे. व्यक्ति बदलतील. पण सिद्धांत बदलत नाहीत. ते व्यक्तीच्या लहरीनुसार बदलताही कामा नयेत. महाजन कमिशनच्या अहवाला-बाबत लहरी, विवेकशून्य, सिद्धांतशून्य व जनमानसाला ठोकरणारा असेच म्हणणे भाग आहे. निवडणुकीत व्यक्त होणाऱ्या मताबद्दलचे त्यांचे मन हा तर 'मूलेकुठारः' आहे. बेळगावची निवडणूक ही सातत्याने जर ह्याच तत्वावर लढविली जात होती (हे 'महाजनां'ना माहीत नाही असे कसे म्हणावे?) तर तीत व्यक्त झालेले 'जनमानस' हे विचारार्ह नाही असे म्हणणे म्हणजे 'लोकशाही'बद्दल तत्वतःच अनादर व्यक्त करण्यासारखे आहे. महाजन अहवाल हा एक "न्याया-लयीन विनोदाचा" अजब नमुना आहे असे म्हटले तर वावगे होणार नाही. न्याय-मूर्तीने न्याय द्यावा ही सामान्य अपेक्षा! पण "न्यायमूर्तींनी" कोलांटया उड्यांचे रेकॉर्ड प्रस्थापित करावे हे आगळेच नव्हे काय? त्याविषयीच्या तपशीलात शिरणे म्हणजे त्या कोलांटया उड्यांना कलापूर्ण खेळाची प्रतिष्ठा देण्यासारखे होईल, असे वाटते.

सेनापति बापटांचा उपवास थांबला, इंदिराजींना दोन वर्षं उसंत मिळाली, बेळगावकरांना लढा जिवंत ठेवावा लागला, महाराष्ट्र शासनाची लाज राखली गेली. म्हैसूरी 'शड्डू'मारीला मोकळे रान मिळाले आणि महाजनांना 'काम' मिळाले. घोळ मात्र कायमच! आता महा-राष्ट्र शासनाने व लोकांनीही तो अहवाल फेटाळला आहे. माझ्या मते इतका 'न्यायशून्य' व 'विनोदी' अहवाल गेल्या वीस वर्षांत 'घडला' नाही. 'महा-जनां'ना नेमकी काय कामगिरी सांगितली होती? भाषिक सिद्धांतावर सीमाप्रश्नाची पाहणी करण्याची की भूवाटपाची? महा-राष्ट्र शासनाने ती तत्वशून्य, सिद्धांतशून्य नेमणूक मान्य करण्यातच चूक केली. 'घोळा'ला जीवदान दिले असे म्हणणे क्रमप्राप्त आहे.

आता 'अहवाला'ची उत्तरक्रिया सुरू

झाली आहे. 'म्हैसूर'ने ढेकर दिला आहे. निजलिंगप्पाची विल्ली 'सौ चूहे खा के' आता हाज यात्रेला निघाली आहे. पण महाराष्ट्र–केरळमध्ये मात्र हा 'उत–पात' सहन होत नाही असे दिसते आहे. मुंबईच्या प्रश्नावर रान पेटले, तसे ह्या प्रश्नावर पेटविण्याचा प्रयत्न समिति करीत आहे. पण ते कठिण दिसते. समिति 'एकसंघ' राहिलेली नाही. 'राष्ट्रीय पक्षां'च्या महाराष्ट्र–म्हैसूर शाखा परस्पर विरोधी भूमिका घेऊन आहेत. (त्यांना जगायचय्) विदर्भ–मराठवाडा उदासीन आहे. (अणे तर रामशास्त्र्याचा आव आणून महाजन अहवालाला प्रशस्तीपत्रे देत आहेत) अशा परिस्थितीत हे आंदोलन आज उभे आहे. प्रत्येक वेळी 'सिद्धांत' स्वीकारण्याऐवजी शासनाने भीति, दडपण महत्वाचे मानले आहे. 'आजचे मरण उद्यावर'ची भूमिका घेतली आहे. बेळगावबाबत तर सर्व लोकशाही सिद्धांतावर विसंबून महाराष्ट्राने बाजू जिंकली आहे. तो विजय मान्य न करणे म्हणजे शासनानेच 'लोकशाही' मारणे होईल. आता लोकसभेतच ह्याचा निर्णय होईल. लोकसभेत मराठी प्रवक्ते न्यायाची मागणी यशस्वी करून घेतील अशी आशा करू या. 'बेळगाव–कारवार' प्रकरणी केंद्रिय 'घोळ' आणि सिद्धांतशून्य कमिशने ह्यांनी जी भूमिका घेतली आहे त्यामुळे न्याय, लोकशाही, मतदान वगैरेवरचा विश्वास शासकीय कबरीत गाडला जातो आहे ही वस्तुस्थिति मात्र नाकारता येणार नाही.

"**तुमचा होतो खेळ** (घोळ), **आमचा जातो जीव**" असं म्हणत सीमेवरची मराठी जनता आता दिल्ली–मुंबईकडे पहात आहे. (अहवाल जाळायला सुद्धा बेळगावात बंदी. जणु तो अहवाल म्हणजे भारताची राज्यघटनाच! ती जाळणारांचे पुतळे उभारायला कामराज गेले होते हे दृश्य मोठे बोलके आहे)

## राजकारणातील पार्टी-बदल

गेल्या सार्वत्रिक निवडणुकीत कॉंग्रेसची 'यावच्चंद्र दिवाकरौ' सत्ता खिळखिळी झाली. नेहरूंनंतरच्या पहिल्याच निवडणुकीत 'कॉंग्रेस'ला 'तारणहार' न लाभल्याने कॉंग्रेस 'पोरकी' झाली. इंदिराजींची माया आणि कामराजांची 'किमया' कॉंग्रेसला वाचवू शकली नाही. आणि मग विरोधी पक्षांची 'सरकारे' येण्याचा 'नवा प्रयोग' सुरू झाला. ते स्वप्न पाहणारा द्रष्टा पुरुष (डॉ. लोहिया) आता निघून गेला असला तरी 'प्रयोग' मात्र चालूच आहे. विरोधी पक्षांनी 'समान ध्येय कार्यक्रम' हाती घेऊन, एकत्र येऊन कार्य करण्याचा हा नवा प्रयोग 'बरा' वाटला तरी 'खरा' आहे असं म्हणण्यासारखी परिस्थिति तूर्त तरी 'इये देशी' आहे असे म्हणता येत नाही. फुटीर कॉंग्रेसजन विरोधी पक्ष यांची ही मोट वारंवार हेलकावे खाताना दिसते आहे. 'पार्टी–बदला'च्या खेळाचे प्रथम विरोधी पक्षांनी कौतुक केले. राजस्तानमध्ये तर "राष्ट्रीय सुरक्षेला" धोका दिसत असूनही डोळेझाक करून सुखडियाशेठ नीतिविचित्रांशी शय्यामैत्री चालविली आहे. हाती आलेली सत्ता घालवायला कुणीच तयार नसतो. मग तो बंगाली 'अजय' असो किंवा पंजाबी "राव बिरेन्द्र" असो. त्यापायी मागे कॉंग्रेसने ज्या क्लृप्त्या लढविल्या त्यात ही मंडळी (मूळ जात कॉंग्रेसचीच) तरबेज असल्याने 'राज्य' टिकविण्यासाठी विरोधी राज्यातून आता 'आटयापाटया'चा खेळ सुरू झाला आहे. कौतुकाचे चेहेरेच आता काळजीग्रस्त झालेले दिसत आहेत त्यामुळे त्या त्या राज्यातील जनता अधिक चिंताग्रस्त झाली आहे. हे 'कडबोळे' राज्य अनेक पक्षांच्या कुबडया घेऊन चालत असल्याने राज्य चालविण्याऐवजी आपापल्या कुबडया 'स्टेक'ला लावून त्याचे मूल्य मागितले जात आहेसे दिसते. विरोध पक्षांचे एकत्र राहणे हे परस्पर विश्वास व परस्पर सामंजस्य ह्यावर अवलंबून असते. आज संयुक्त मंत्रिमंडळातले विविधपक्ष देशशत्रूंवर 'व्हिजिलन्स' ठेवायच्या ऐवजी परस्पर मंत्र्यांवरच (अर्थातच विरोधी दलातल्या) व्हिजिलन्स ठेवण्यात गढून गेलेले दिसताहेत. राज्य चालविणारी सारी शक्ति सौदेबाजीत कारणी पडताना दिसते आहे. "संयुक्त विधायक दले" ह्या नावातले सारे शब्द आता अर्थशून्य ठरू पहात आहेत. प. बंगालमधले कम्युनिस्ट अजय मुखर्जी यांना धारेवर धरून, यादवीची धमकी देऊन, अराजकाच्या वाटेवर बंगालला नेऊ पाहताहेत. हरयाना प्रांताचे चित्र तर भलतेच 'विनोदी' व 'दयनीय' झाले आहे. तेथे तर 'एकमता'साठी मंत्रिपदाची लाचलुचपत चालू आहे. सर्वसामान्यपणे असे म्हणता येईल की, संयुक्त मंत्रिमंडळाचा हा प्रयोग म्हणावा तसा यशस्वी झाला नाही. त्यात 'मॅच्युरिटी' (राजकीय व वैयक्तिकही) दिसत नाही. राजकीय सामंजस्य नाही. जनहित तर नाहीच नाही. आज 'राज्य' टिकवणे, सत्ता टिकविणे व त्यासाठी कोणतीही सौदेबाजी कटु न मानणे हेच धर्मकृत्य ठरलेले दिसत आहे. ही मोट बांधताना काही 'तत्वे,' काही सिद्धांत ठरणे–ठरविणे आवश्यक होते ते घडले नाही. 'पार्टी-बदला'बद्दल काही 'शासन' (निदान मनाचे तरी) उरले नाही. 'निवडणुक यंत्रणा'च मुळी ह्या पार्टीबदलातून हास्यापद ठरते. मग आपण प्रतिनिधी नेमके कुणाचे? असा प्रश्नही ह्या पार्टी-बदलवाल्यांनी स्वतःच्या मनाला विचारला नाही. जनता येत्या पाच वर्षासाठी निद्रिस्त झालेली असल्याने जाब विचारणार कोण? ती बिचारी निर्विकार मुद्रेने ह्या माकड उड्या पहात बसली आहे. मद्रास, ओरिसा, सोडले तर बाकी सर्वत्र हे दृश्य दिसते आहे. अर्धा देश अशा अस्थिर राजवटीखाली असणे हे अंतिम हिताचे नाही. पण त्यासाठी 'पार्टी-बदला'बाबत काही घटनात्मक बंधन घालता येईल किंवा काय याचा विचार झाला पाहिजे. जनतेने करांच्या व अन्य रूपाने दिलेला पैसा असल्या सौदेबाजीच्या व राजकीय अस्थिरतेच्या खेळावर उधळला जाता कामा नये. राजकारणाचा हा खेळ (खंडोबा) ह्या गरीब देशाला परवडणारा नाही खास. इथेही काही स्वीकृत व घटनात्मक आचारसंहिता निर्माण करणे आवश्यक आहे असे वाटते.

**—सारस्वत**

# ऐसीं अक्षरें रसिकें

## मानवी स्वभावाचे पैलू

**गेल्या** दहा वीस वर्षांत मराठी कथेचा प्रवाह वेगळी वळणे घेत गेलेला दिसतो. आशय आणि अभिव्यक्तींच्या भिन्न भिन्न तऱ्हांमुळे कथेमध्ये वैचित्र्याबरोबरच एक प्रकारचे वैशिष्टय लाभू लागले. वेगवेगळ्या वेळी मराठी कथेची रूपे एक वेगळाच आकार घेऊ लागली. कधी ती रूपकाच्या भाषेत बोले तर कधी गूढ मानसिक विश्लेषण करू लागे. कधी वास्तवाच्या वेगवेगळ्या छटांचे केवळ चित्रण करू लागली. परंतु या सगळ्या प्रकारांचा रोख मात्र वास्तव जीवनाचे कलात्मक चित्रण करण्याकडे होता. गेल्या १०।२० वर्षांतील कथांकडे बघितल्यास अनेक कथाकारांनी आपल्या वैशिष्ट्यामुळे मराठी कथेला एक आगळे रूप देण्याचा प्रयत्न केला. गंगाधर गाडगीळ, व्यंकटेश माडगूळकर, पु. भा. भावे, या त्रयीनंतर अनेकांनी आपल्या परीने मराठी कथेच्या विकासास आणि विस्तारासहि हातभार लावला. या कथाकारांमध्ये श्री. सदानंद रेगे यांनीहि आपल्या कथांना एक वेगळे स्थान प्राप्त करून दिले आहे.

सदानंद रेग्यांच्या कथेचा विचार करताना त्यांच्या कथातून दिसणारी 'माणसे' हीच जास्त डोळ्यासमोर रहातात. पर्यायाने मानवी स्वभावाचे वेगवेगळे पैलू त्यांच्या जीवनाचा मागोवा घेत घेत रेगे दाखवू लागतात. रेग्यांच्या कथाविश्वाला मर्यादा असल्याच तर मानवी स्वभाव आणि वास्तव यांच्याच आहेत परंतु प्रामुख्याने त्यांच्या कथा मध्यमवर्गातील सामान्य माणसाभोवतीच जास्त फिरतात. या माणसांच्या स्वभावांचे नमुने दाखवताना सदानंद रेगे त्यांच्या स्वभावाबरोबरच त्यांच्या सुखदुःखाच्या विश्वाचेही दर्शन घडवतात. सदानंद रेगे अशा मानवी स्वभावाची वैशिष्टये सरळ सरळ वर्णन करून दाखवीत नाहीत, तर त्यांच्या स्वभावाचे ज्या अनुभवातून दर्शन होईल त्या अनुभवाला आपल्या स्वतःच्या दृष्टिकोनातून शब्दांकित करतात.

### व्यक्तिदर्शन घडविणारे रेगे

माणसाच्या स्वभावाचे वेगवेगळे पैलू केवळ वर्णनातून न दिसता त्या त्या प्रसंगासह आपल्यापुढे येतात. मला वाटतं. सदानंद रेग्यांची खास वैशिष्टये इथून सुरू होतात. 'चंद्र सावली कोरतो' या कथा-संग्रह तील बऱ्याचशा कथांतील माणसे ही अशीच आपल्यापुढे येतात. 'पायगुण'मधील वकीलसाहेब, वकिलीणबाई, यशोदा आत्या, नारायण ही माणसे एकत्र येतात ती परिस्थितीमुळे आणि त्यांच्यात संघर्ष निर्माण होतो तो त्यांच्या स्वभावातील वैचित्र्यामुळे. शब्दाकरिता संवय सोडू पहाणारा आणि संवयीमुळेच शब्द सोडणारे रेसचे व्यसनी तात्या 'शब्द' या कथेत दिसतात. स्वतःचे वैशिष्टय हरविल्याची जाणीव झालेले लेखक आबासाहेब 'पानझड'मधे दिसतात. प्रेमळ मित्राचे दर्शन 'मल्हारी'-मध्ये होते, कृतकृत्य होऊनहि परत जीवनात गुरफटलेले 'भाऊ', नानूच्या मरणकाळीहि त्याच्या वखवखीतून दिसणाऱ्या वखवखलेल्या आत्याबाई, (वखवख) 'रामचंद्र गंगाधर डभोईकर' या सामान्य माणसाची अखेर (अखेर) अशी कितीतरी माणसे ह्या कथांतून आपल्याला दिसतात. परंतु या माणसांना एरवी काय वैशिष्टय लाभले असते? व्यवहारी जीवनात ही लक्षातसुद्धा न येणारी माणसे. परंतु रेग्यांच्या कथांतून त्यांचे घडणारे दर्शन मात्र अविस्मरणीय आहे. कारण रेग्यांच्या प्रतिभेतून त्यांना आणि त्यांच्या जीवनातील वैशिष्टयपूर्ण अनुभवाना एक वेगळाच अर्थ लाभलेला असतो. रेगे त्यांच्या मनाची खोली पाहून येतात आणि त्यामुळे त्यांना लाभणारी त्रिमिती ही त्यांच्या जीवनाचे वास्तवपूर्ण आणि कलात्मक दर्शन घडवितात.

### सुप्त जाणीवेची पहेचान

रेग्यांचे आणखी एक वैशिष्टय या कथांतून जाणवते ते म्हणजे बालमनाच्या चित्रणाबरोबरच काही सुप्त पण जाणवणाऱ्या जाणिवांचेहि दर्शन काही कथांतून ते घडवतात. अशा कथांची, अभिव्यक्तीची पद्धतहि त्या ठिकाणी बदलते. 'मिनी'चे विश्व मिनीच्या साकार होऊ पाहाणाऱ्या शब्दांतून होते—मिनीच्या डोळ्यातूनच त्याचे दर्शन होते. (मिनी) स्वतःबद्दलची जाणीव झालेली यमुना आपले नांव ज्योतिर्लेखा न सांगता यमुना म्हणूनच सांगण्याचा हट्ट धरते (यमुना), खड्ड्यात पुरल्या जाणाऱ्या जीवाचे रहस्य समजल्याबरोबर 'मी'च्या पोटातच खड्डा पडतो (खड्डा), कॅन्सरच्या गाठीने पिडलेले नाना (कॅन्सर), जन्माचे ऋण फेडणारा बापू (ऋण) अशा कथा वेगळ्या विश्वात—परिचयाचे असूनहि वेगळ्या—घेऊन जातात. जमावाचे चित्रणहि त्यातील पांच सहा माणसांच्या संवादांतून त्यांनी केलेले आहे. (माणसांची तत्त्वज्ञानं..नि..) संसारातील कलहाचे चित्रणहि वेगळेच दिसते (पागोळ्या).

ही झाली सामान्य दैनंदिन जीवनातील माणसांची आणि त्यांच्या अनुभवांची चित्रे. पण त्याचबरोबर रेगे एखाद्या जाणिवेचा वेध एका वेगळ्याच दृष्टिकोनातून घेतात त्यावेळेला ती कथा वेगळेच रूप धारण करते. त्यात मग वास्तवाबरोबरच प्रतिभेने निर्माण केलेले काल्पनिक यांचे एक वेगळेच मिश्रण तयार होते. त्या वास्तव आणि काल्पनिक यांच्या रसायनातून जीवनाचा तिरकस वेध घेणारी कथा जन्म पावते. (सूर्यावरचं कफन) क्वचित अशी ही कथा गद्यकाव्य, होते. 'चंद्र सावली कोरतो'मधील 'दामू' ह्या खुळ्याच्या दृष्टिकोनातून दिसणारं भोवतालचं जग रेग्यांच्या प्रतिभेतून जन्मल्यामुळे त्याचे आगळेपण डोळ्यात भरते.

### वास्तविक असूनही मुक्त

रेग्यांच्या कथेतील कल्पनाना वास्तवाचा आधार असूनसुद्धा त्या कल्पना मुक्त आहेत. त्या कल्पना जेव्हा शब्दांकित होतात तेव्हा खास रेग्यांचे शब्द घेऊन येतात. रेग्यांच्या या सर्व कथांतून वातावरणनिर्मिती होते ती सुद्धा खास रेग्यांच्या पद्धतीने. पाऊस आणि ऊन यांचे रेग्यांना फार आकर्षण असावेसे वाटते कारण पावसाच्या आणि उन्हाच्या विविध रूपातून रेगे भोवतालच्या विश्वाची लय आणि माणसाच्या स्वभावाची लय पकडतात. त्यामुळे चटकन् एक वेगळीच आपलुकी त्या कथाविषयाबद्दल वाटू लागते. या माणसात जशी लहान माणसे आहेत तशी वृद्ध, तरुण, मध्यमवयीन इत्यादि माणसेहि आहेत. तथाकथित 'प्रेम'कथेला मात्र येथे थारा नाही.

**—श्रीहरी जोशी**

**[चंद्र सावली कोरतो. ले. सदानंद रेगे**
पॉप्युलर प्रकाशन : पृष्ठे २३१ कि. ६ रु.]








# "सेनापति ! शतायु व्हा"

भारतीय क्रांतिकार्याच्या 'आदि' पर्वाचे एक सुवर्णपान ज्यांनी कष्टांच्या, रक्ताच्या, हालअपेष्टांच्या शाईने लिहिले आणि अविरत त्या प्रतिज्ञा पालनार्थ ज्यांनी शरीर झिजविले त्या महर्षी सेनापति पां. म. बापट ह्यांना ह्या महिन्यात ८८ वे वर्ष लागले आहे, "बेटा अजून नेतच नाही" असं हसत हसत तात्या नेहमीच म्हणतात. मग डोळ्यात पाणी तरळते. 'तात्या सावरकरही गेले' म्हणून उद्गार निघतात पण "मी राहलो. अजून काहीतरी बेटाला करून घ्यायचं असेल माझ्याकडून, म्हणून राहलो. कधीचा ठोठावतो आहे." मृत्यूबद्दल बापट आता स्थितप्रज्ञ झाले आहेत. ते मुळाचेच वृत्तीने योगी आहेत. प्रथम श्रेणीचा हा हुषार विद्यार्थी! कविवृत्तीचा. भावनाशील (त्यामुळेच क्रांतिकार्यात पडणे शक्य झाले) मग वनवास उपवास आणि कारागृहीवास घडला. त्यातून घडली स्थिर वृत्ती. म्हणून सेनापति वृत्तीने सेनापतीच राहिले आहेत. "हे पुष्प देशावरणी कधीच समर्पित झाले आहे" ही त्यांची धारणा आहे. त्यामुळे 'गोवा मुक्ति संग्राम' सुरू झाला. तेव्हा सेनापति अग्रभागी राहिले. त्यांचा अनन्वित छळ झाला. सं. महाराष्ट्र आंदोलन, नंतरचा सीमाप्रश्न यातही ते पुढेच होते. महाजन अहवालावर प्राणांतिक उपोषणाचा संकल्प त्यांनी सोडलाच आहे. वयाच्या ८८ व्या वर्षीही सेनापति सेनापतीच राहिले आहेत. रक्त गोठलेले नाही. केस पिकले तरी मन दमदार आहे. मान ताठ आहे. बाणा शूराचाच आहे. आणि पुन्हा हे कमळ श्रीहरिसाठी मरणार आहे हा साक्षात्कार झालेला आहे. त्यामुळे जे त्याचे ते त्यालाच देऊन टाकण्याची वृत्ति! त्यामुळे सेनापतींच्या सहवासात आपला जीवनावरचा, कर्तव्यांवरचा विश्वास वाढतो. समर्पण वृत्ती वळावते. अशा ह्या प्रेरक सेनापतींचे मी ह्या वाढदिवसाच्या निमित्ताने अभिनंदन करतो.

सीमेवरची माणसे शंख फुंकीत आहेत. अन्यायाविरुद्ध एकात्म मराठी माणूस उभा राहण्याची गरज उत्पन्न झाली आहे. अशा वेळी पक्षातीत सेनापती हवे आहेत. बापटांच्या रूपाने ते उभे आहेत. बळ द्या. एकी द्या! यश द्या! अन्यायाला जय मिळाला तर जनतेचा लोकशाहीवरचा विश्वास उडेल.

सेनापति, त्यासाठीच तुम्ही हवे आहात. शतायु व्हा!! दीर्घायु व्हा!!

—आदित्य

[ पृष्ठ ५४ वरून-इंद्रधनुष्य ]

सेन्सॉरचा स्पर्शही न झालेल्या या चित्रपटांसाठी मुद्दाम आठवडाभर एक्सलसियर सिनेमा भाडयाने घेण्यात आलेला होता व तेथे फक्त या संस्थांच्या सभासदानाच प्रवेश होता.

ज्या दिग्दर्शकांच्या कलाकृतींचा या महोत्सवात अंतर्भाव झालेला होता त्यांचा परामर्श पुढील अंकी घेऊ. ● ● ●

[ पृष्ठ ४५ वरून-ललितकलादर्श ]

लागला की, नाटकात काहीच दम नाही. नाटक करणाऱ्यांचेच खरे कौशल्य आहे. आपल्या नाटककारांचा केला गेलेला हा अधिक्षेप भालचंद्रांना मुळीच सहन झाला नाही. त्यांनी ताडकन् भरसभेत सांगितले, "नाटकात जर दम नसता तर आम्ही काय रडलो असतो कपाळ?" 'स्वामिनीने' अशी एकच धमाल उडवून दिली. 'स्वामिनी'च्या संबंधात आणखी एक संस्मरणीय गोष्ट म्हणजे नायिका काशीची नाविन्यपूर्ण व अवघड भूमिका भालचंद्रांच्या पत्नी आणि ललितकलेच्या स्वामिनी सौ. मालती पेंढारकर या इतकी अप्रतिम करतात की जणु या भूमिकेसाठीच त्यांनी जन्म घेतला असावा, असे वाटते. आकाशगंगेतील 'योजने'ची गूढरम्य भूमिकाही त्या अतिखेळकरपणाने रंगवतात.

भालचंद्रांना मुलुखगिरीचा भारी शौक आहे. आपली नाटक मंडळी बरोबर घेऊन त्यांनी सर्व भारताची यात्रा केली आहे. त्यांच्या हौसेला मोल नाही. त्यापायी प्रवासाचे सर्व कष्ट, जबाबदाऱ्या अन् जिकीर ते आनंदाने स्वीकारतात. बऱ्याच वेळा रेल्वे गमतीगमती करते. सामान एकीकडे तर मंडळी दुसरीकडे, असे विनोदी प्रकार घडतात, मग खटाऱ्यापासून विमानापर्यंत सर्व वाहतुकीच्या साधनांचा उपयोग केला जातो. कारण ठरलेल्या वेळीच नाटक सुरू झाले पाहिजे हे त्यांचे व्रत! मग बिनहिशेबी खर्च करावा लागतो. पण त्याविषयी ना खंत, ना खेद, कारण भालचंद्रांना एकच ध्यास लागलेला असतो की महाराष्ट्राबाहेर गेलेल्या मराठी माणसांना 'ललितकले'च्या मांडवात एकत्र आणायचे आणि त्या बरोबरच त्या त्या प्रांतातील महाराष्ट्रीयेतरांना मराठी रंगभूमीचे वैभव दाखवायचे. या ईर्षेपायी पैसा आणि परिश्रम यांची पर्वा ते करीत नाहीत.

'ललितकलादर्श' आज सतत साठ वर्षे साहित्य, सातत्य आणि साधना या गुणांवर महाराष्ट्राचे भूषण बनली आहे. आपल्या नांवातील 'आदर्श' या शब्दाचा तिला कधीच विसर पडलेला नाही. लोकनेत्यांनी सर्वांगांनी आदर्श असायला हवे, असे एकेकाळी मानले जात होते. आणि अभिनेत्यांनी आपल्या चारित्र्याकडे कानाडोळा केला तरी चालतो, असाही गैरसमज दुर्दैवाने प्रचलित आहे. खरोखर अभिनेत्यानीच सदैव चारित्र्यवान असले पाहिजे. कारण त्यांचे लोकमानसावर अधिक आकर्षण असते व समाज त्यांच्याच मागे अधिक असतो. त्यांच्याच अनुकरणात भूषण मानतो. केशवराव, बापूरावांनी आपले उच्च आदर्श कधी ढळू दिले नाहीत आणि भालचंद्रही त्याच परंपरेचे पाईक आहेत. म्हणून महाराष्ट्राच्या हृदयात 'ललितकलादर्श'ला अढळ स्थान आहे.

★★★

REGD. NO. MH-450 Licence No. 170 to post without pre-payment DECEMBER 1967

DIPAVALI MONTHLY



Cover Printed At Asha Printery, Bombay-4

अनुक्रमणिका